


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन












अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# दीपावली

साहित्य • कला • संगम

सप्टेंबर

१९६३

वर्ष ९ वें



## श्रेयनामावलि—

*कथा :*

- रात्र सख्या अंधारी—दत्ता कदम • पत्रे लिहाचंय मला—प्रेमानन्द वळवईकर
- नवग्रहांची पीडा—यशवंत र. इंगळे • खोबरेल तेलाच्या बायका-सैनिक • दोन लाखाचा दरोडा—शर्विलक • ध्रुव ढल्ला—श्रीकृष्ण ठाकूर.

*एक व्यंग कृति :*

- चित्रपत्रें—एका व्यंगचित्रकाराचें स्वप्नरंजीत पत्र रेखाटन.

*चालू कादंबरी :*

- भीष्माचा डोंगर—श्रीराम कामत लिखित कादंबरीचा पुढील भाग.



*ललित व विनोदी लेख :*

- इष्काची चटक लागली—पद्माकर गोवईकर
- सौंदर्यवेडी प्रियंवदा—यशवंत शास्त्री

सदरें :

- ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन—केशव मेश्राम, श्रीपाद भागवत, प्र. श्री. नेरूरकर.
- जय नांवाच्या इतिहासावरील वाचकांची प्रतिक्रिया. • दीपमाला—सारस्वत.

याशिवाय हास्यचित्रें, रिंगचित्रें, व्यंगचित्रें, पानपूरकें वगैरे.

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींही अधिकृत मतें असतातच असें नाहीं.* प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.



अनुक्रमणिका

## दीपावली

**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज** असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# कोळसा डाग देणारच

**कामरूप** देशांतील अरण्यांत कौटिल्या नांवाची एक गाय रहात होती. ही मोठी बुद्धिधना असून तिनें आपलें जीवन मोठें सुखमय केलें होतें. त्याच रानांत रशियक या नांवाचा एक सिंह रहात होता. कौटिल्येचा पुष्ट पुठ्ठा पाहून अनेकदां रशियकाच्या तोंडाला पाणी सुटत असे पण त्यावेळीं तिच्या आणकुचीदार शिंगावर त्याची नजर पडून तो आपलें मन आवरी. तरीही संधी मिळणें शक्य व्हावें या धूर्त विचारानें त्यानें कौटिल्येशीं कामचालू स्नेह राखिला होता. आणि तिनेंही तो समजपूर्वक चालूं दिला होता.

कालें करून कौटिल्येला अहिंसक नांवाचा पुत्र झाला. व रशियकाला चीनक नांवाचा पुत्र झाला. अहिंसक हा मोठा सद्गुणी, शांत स्वभावी, सरळ मनाचा होता. तो मातेचा फार लाडका असून तिची त्याच्यावर नेहमी नजर असे. विशेषतः चीनक आणि अहिंसक यांची वाढती मैत्री अहिंसकाला अहितावह होऊं नये यासाठी ती तत्पर असे; कारण चीनकांत पित्याचे गूण उतरणे संभवनीय आहे याची तिला जाणीव होती.

चीनक आणि अहिंसक हे शेपटीला शेपटी गुंडाळून हम्मा भाई भाई, व्हांव व्हांव भाई भाई असे ओरडत साऱ्या रानांत हुदडत असत. धुमाकूळ घालीत. त्यांची ही मैत्री साऱ्या वनाचा कुतूहलाचा विषय झाली होती. अन्यथा चीनकाला दुर्गम्य व अज्ञात अशा अनेक प्रदेशांत केवळ कौटिल्येच्या पुण्याईनें अहिंसकाला प्रवेश असल्यानें तो आपल्याबरोबर चीनकालाही हट्टानें घेऊन जाई. कौटिल्येच्या भिडेमुळें तत्रस्थ पशू अहिंसकाचा हा अप्रयोजकपणा सहन करीत. अर्थात् यांतून पुढें भलें निघणार कीं नाहीं याविषयीं ते साशंकच असत.

पुत्राला आतां शहाणपण यावयास हवें हें जाणून यथाकाल कौटिल्येनें अहिंसकाला उपदेश केला. ती सारी पार्श्वभूमी सांगून म्हणाली,

दुर्जनेन समं सख्यं प्रीतिं चापि न कारयेत् ।
उष्णो दहति चाङ्गारः शीतः कृष्णायते करम् ॥

पुत्रा, कोळसा थंड असला तर असला तर हाताला डाग देतो आणि गरम असला तरीही डाग देतो. तेव्हां दुष्टांपासून सांभाळून रहावें बरे ! पण अहिंसकाच्या ध्यानांत तेव्हां या उपदेशाचें सूत्र आलें नाहीं. तो भाई भाई असें ओरडत हुंडारत राहीला.

अखेर व्हावयाचें तें झालेंच. अहिंसक बेसावध असतांना एकदां चीनकाचा मूळ स्वभाव उफाळला आणि त्यानें अहिंसकाचा एक लचका तोडून गिळून टाकला. रक्तबंबाळ अहिंसकाला आक्रोशतां भुई थोडी झाली. पण सुदैवानें इतर वनचर शेजारीं होते ते धांवून आले आणि अहिंसकाची सुटका झाली. रशियकानेंही वेळ मारून नेण्यासाठीं चीनकास दम देऊन थातुरमातुर सारवासारव केली.

आतां पुढें काय होणार अशा भ्रांतींत अहिंसक आपले गोंधळलेले विचार आकारांत आणण्याचा प्रयत्न करीत असतांनाच त्याला नवेंच नवल नजरेस आलें. तें म्हणजे चीनक आणि रशियक हे आपसांत गुरगुरत आहेत.

व्हांव ! तूं मूर्ख आहेस. तुझीं तत्त्वें चूक आहेत.

व्हांव ! तूंच मूर्ख. तुझींच तत्त्वें चूक. असा त्याचा झगडा चालू झाला. तो झगडा बघून अहिंसक बैल आनंदानें उधळूं लागला तेव्हां कौटिल्या त्याला म्हणाली,

'पुत्रा, सावध–अरे, सावध ! तुझें लक्ष या गुरगुरीत गुंतलें आहे असें पाहून तो पहा चीनक तुझ्यावर जोरदार हल्ला करता येईल असा पवित्रा घेत आहे. तो पहा रशियक एका बाजूला त्याच्यावर गुरगुरत असतां त्याला मदत करीत करीत त्याच्या जखमा चाटीत आहे. तूं नुसताच तमाशा पहात बसूं नकोस. जरा सावध रहा बरें.

कौटिल्येचा हा उपदेश ऐकून अहिंसक सावध झाला आणि त्याच्या लक्षांत आलें कीं आपली माता अगदींच कांहीं दुधखुळी नाहीं !

—उषाकान्त



अनुक्रमणिका




स. न. वि. वि.

आपला ' आगष्ट 'चा ' दिपावलीचा ' अंक आज वाचला. ' दर्भाचा कावळा ' ही वसंत फेणे यांची लघुकथा फारच आवडली. त्यांनीं मामीचे शब्दचित्र फारच उत्कृष्ठ चितारलें आहे. वाचतांना डोळ्यांतून टिपें न पडतील तरच नवल. पण शेवट आवडला नाही. ' मामीच्या ' आयुष्यांतील एक एक प्रसंग इतक्या भावपूर्ण रंगविले आहेत. कीं 'मामीच्या' बद्दल एकप्रकारची उदात्त भावना वाचकाच्या हृदयांत निर्माण होते. त्यामुळें लेखकानें शेवटी विचारांना जी निराळी कलाटणी देण्याचा प्रयत्न दिला आहे; तो बरोबर वाटत नाही. विशेषतः ' बाबा ओटीवर अंथरुण घालून झोपत व मामी मला जवळ घेऊन माजघरांत झोपत असे. ' मामी गेल्यानंतरच बाबा आंत झोपावयास लागले ' बाबाच्या पुढ्यांत वाकून नमस्कार केला व दोन्ही पायांना हात लावला ' इत्यादि एक ना अनेक प्रसंग चितारून लेखकानें वाचकाच्या मनांत मामीच्या निष्कलंक चारित्र्याचा ठसा उमटविला आहे मग असा विचित्र शेवट लेखकाने कां करावा हें कळत नाही. तसा शेवटच जर करावयाचा होता तर त्या संबधींचे बिजरूप प्रथमार्धांत थोडें तरी रूजवावयाला हवें होते असे वाटतें.

' अखेर काळानें मात केली ' हा चेंदवणकरांचा अनुवादित लेख खरोखर वाचनिय आहे. लिहलेली गोष्ट इतिहासाला धरून आहे की काय कळत नाही. ' इतिहास सत्य ' असल्यास ज्ञानात नविनच भर पडल्याचे होईल. कळावें

आपला,

**प्र. ना. महादेवकर**

नागपूर

स. न. वि. वि.

आपला जुलै महिन्याचा अंक वाचला व अत्यंत संतोष वाटला. खास पत्राद्वारें कळविण्याचें कारण की अंकामधील ' विद्रोह ', श्री. बागूल व श्री. कदम लिखित ' पसारा ' ह्या कथा उत्कृष्ट वाटल्या. ' विद्रोह ' मधील वर्णनें अत्यंत वास्तव आहेत.

' नरेचि केला हीन किती नर ' या उक्तीनें बाबूराव बागूलांच्या कथेनें समाज माणसाची किती उपेक्षा करतो हें प्रभाविरित्या दाखविले आहे.

ग्रामीण कथा दोन तिन नसाव्यात ही विनंती दीपावलीमधील पानन्पान वाचनीय असतें ही आतां खात्री झाली.

' भीष्माचा डोंगर ' ही कामत लिखित कादंबरी उत्सुकता वाढवते व मी दर एक तारीखेस दीपावलीची वाट पहात असतो. यशस्वी मासिकाचे संपादक म्हणून उतरोत्तर आपणांस सुयश व भरभराट चिंतून हे पत्र पुरें करतों.

आपला नम्र,

**आर. एस्. थेटे** बी. ए. बी. एड्.

ग. नं. ६/धुळें.

स. न. वि. वि.

आपल्या दिवसेंदिवस वृद्धिंगत होणाऱ्या ' दिपावली ' मासिकाची मी एक नियमीत ' वाचक ' आहे. आपल्या अंकाचे निरनिराळे विशेष अंक प्रसिद्ध होत असतात. त्यांतील काव्य साहित्य उत्तम असतेंच या बद्दल दुमत होणार नाहीं. तरी आपणास एक विनंती कराविशी वाटते कीं वर्षांतून एकदां तरी आपण एकादा ' काव्य ' विशेष अंक काढावा व त्यांत काव्याचे भरपूर आस्वाद घेण्यासारखें काव्य प्रतिथ यश कवीं कडून घेवून छापावे. किंवा स्पर्धा टेऊन ती सर्व कवीस खुली असावी. अथपासून इतिपर्यंत व्यंगचित्रें, रंगचित्रें काव्य विषयकच असावी—कल्पना स्वीकारण्या सारखी असल्यास जरूर स्वीकारालाच.

आपली एक वाचिका

**त्रिपुरी वर्वे**, मुंबई

स. न. वि. वि.

' दीपावली'ची मी एक निष्ठावान वाचक आहे. दीपावलीचा प्रत्येक अंक मला फार आवडतो. तुमच्या अंकांतली विविधता मला फार रुचकर वाटते. इतक्या भरपूर कथा देणारे मासिक फक्त दिपावलीच आहे. 'फळभार गोष्ट' आवडली. अशा ऐतिहासिक गोष्टी तुम्ही जरून द्या. ही एक चटक लागली आहे. अशाच चांगल्या परीकथा कां देत नाही? पुरे झाली ती नव कीं काय कथा ! दीपावलीचा अंक म्हणजे साहित्याची मेजवानीच. साहित्यांतले 'क्वालिटी आइस्क्रिमच.' कळावे.

—सौ. **मीना वासुदेव जोशी**

गिरगांव—मुंबई.








चालू कादंबरी ....

# अग्निमाता डोंगर

—श्रीराम कामत

**कथासूत्र—**

*गावांत नव्या कंपनीचं उद्‌घाटन होणार होतं. त्यासाठीं मंत्री, मामलेदार, डी. एस. पी. वगैरे येणार होते. साऱ्या गांवात दवंडी पिटली गेली.*

*—आणि इकडे दाजी नाबर संतापानें पेटला. धर्म्या मंडपाला आग लावतांना पकडला गेला. पण सावित्रीने त्याला सोडविला. तेवढ्यांतच गोले साहेबाच्या हातीं पत्र पडले. गोले संतापाने भड कले. पत्रांत लिहिलं होतं...' उद्यां ४ वाजतां कंपनीची प्रेतयात्रा निघणार आहे...!'*

**—आतां पुढें वाचा...**

## १०

खळनाथाच्यां देवळांत आंज पोरांना ऊत आला होता. भर-दुपारलाच त्यांनीं भजन काढलं होतं. टाळ खणखणत होते. मृदंग वाजत होता.

' नको नको मना, गुंतू मायाजाळीं—'

हा गोड चढा आवाज श्रीकान्तचा होता. सारे आळवून एक एक ओळ तो सांगत होता. बाकीचीं पोरं म्हणत होतीं, साथ देत होतीं. तीच ओळ घरंगळत, फरफटत दहापंधरा तोंडांत वेडीवांकडी फिरत होती.

॥ कंपनी रे आली—गिळावया ॥
आपुलीच आळ, आपुलेंचं बळ
धांवे खाया फळ—मायाविनी ॥
कां रे नाटांविशी ? ह्या बयेचे प्रताप
देते आहे शाप—उभं गांव ॥
आयत्या बिळांत रिघूं नये आर
चला करा ठार—त्याला आधीं ॥
भलेतरी देऊं सोडूनी लंगोटी
नाठाळाचे पींठीं—हाणूं काठी ॥

पोरें ऐन रंगांत आलीं होतीं. हावभाव आणि अगदीं अभिनयासह भजन चाललं होतं. शेवटचं कडवं तर विशेष आवेशानं आळवलं जात होतं.

तर देवळांत हा असा कालवा चालला होता.

तोच ऐकत आतेबाई बाहेर ओटीवर उभी होती. हंसत, कौतुकानं आपल्याशीं कांहीं पुटपुटत. एवढा अपूर्वाईचा सोहळा तिकडे वर डोंगरांत चालू होता आणि हीं पोरं इथं अजून देवळांतच कशीं ? तिला राहूनराहून नवल वाटत होतं. खरं म्हणजे सकाळपासनं यांचा तळ तिकडे कंपनीच्या मंडपांत असायला हवा होता ! जेवणाखाणाची सुद्धां शुद्ध नसायची ! होय, अशींच लहरी होतीं पोरं--तिचा कान्तासुद्धां ! आतेबाईला काय ठाऊक नव्हतं ?

रानांत जायला रस्ता होता एकच. देवळावरून. देवळाच्या दारांत दीपमाळ, लागूनच पिंपळपार. या पाराला आडवा घालून रस्ता वर रानांत चढत होता.

खालच्या आळींत दाजी नाबराच्या ओटीवरून रस्त्यानं कोणी आलं गेलेलं स्वच्छ दिसे. मुद्दाम नाहीं, आतेबाईची ती जन्माची संवय झाली होती. ओटीवर उभी असली कीं लक्ष लगे या रस्त्याकडे.

आणि आज तर रस्त्यावर भलतीच वर्दळ होती. महारानं काय ढोल वाजवला होता देवजाणे ! आतेबाईनं ऐकला नव्हता. पण उभा आवाठा वर डोंगराकडे लोटला होता. कधीं नाहीं तें दाराला टाळं लावून घरचीं सारीं माणसं बाहेर पडलीं होतीं. बासनांतील खास कपडे अंगावर चढले होते. सोन्यारूप्याचा एकाददुसरा दागिना बायकांच्या गळ्यांत दिसत होता. पोरंसोरं, म्हातारींकोतारीं, तरणेताठे—सगळ्यांची रीघ लागली होती. आवाठ्यांतील लोकं, ओळखीचीं, सलगीचीं. कधीं आतेबाई त्यांना साद घालायची, कधीं लोकंच तिला हटकत. सारखं हें असं चाललं होतं. बाळ्यां नाबराची बायको पोरीबाळी घेऊन आणि आजूबाजूच्या चार भटणी जमवून गेली होती. आतेबाईकडे बघून ती फक्त हंसली. बोलली नाहींच. आणि कधीं नाहीं ती मथीकाकूसुद्धां बाहेर पडली होती. बापू भावोजी गेल्यापासनं खळनाथाच्या जत्रेलासुद्धां ती येत नसे. जाहीर समारंभाला इतक्या वर्षांतून आज प्रथमच ती निघाली होती. ओटीवर आतेबाई दिसली तशीं तोंड फिरवून तिची ही थोरली जाऊ तुरुतुरु दृष्टीआड झाली.

जख्खड थेरडी जाकीनसुद्धां नेटानं पाय ओढीत निघालेली बघून मात्र आतेबाईला हंसू लोटलं. ही डोळेफुटकी कशाला बाहेर पडली ? आतेबाईला काळजी वाटूं लागली.

बस्त्यांव ख्रिस्तावांची माय ही जाकीन सरळ गेली नाहींच. पारापर्यंत गेली आणि मग आठवण झाली म्हणून मागं आली. गुदमरलेल्या आवाजांत तिनं साद घातली, ' वहिनीबाय, आहेस गो बरी ?

वहिनी आतेबाईची सासू. तिला मरून खूप वर्षे झालीं होती. तरी तीस पस्तीस वर्षं. म्हणजे आतेबाईसुद्धां विसरली होती. सासूचा चेहेरा पुसट झाला होता. आठवणी येतनाशा झाल्या होत्या.

अनुक्रमणिका

जाकीनच्या सुनेनं तिची समजूत घातली, ' गो माय, वहिनीबाय केव्हाच सोपल्या. आणि आबा नाबर पण. आतेबाय ही. वहिनीबायची सून, दाजींची बाईल.'

तसा जाकीननं गळा काढला. आबा आणि वहिनी जशीं नुकतींच वारलीं होतीं आणि म्हातारीला ही गोष्ट प्रथमच कळत होती. ती रडूं लागली, ' अगे आवै गे ! हें कसें गे झालें ? सगळीं बरीं माणसं गेलीं. एकटी जाकीनच कशी उरली ?'

आणि हें बऱ्याचं चिन्हं होतं. जाकीन खिस्तांवीण दारांत येऊन रडणं म्हणजे उत्तम शकुन होता. या थेरडीची दृष्ट भारी वाईट! तिला बरं वाटलं म्हणजे संकट ठेपलेलं. आणि दुःख झालं कीं कांहींतरी आनंदाची घटना घडणारच असा गांवांत लोकांचा समज होता.

आतेबाईला याचा अनुभव नव्हता. पण ऐकून सगळं माहीत होतं. म्हणूनच जाकीन रडूं लागलेली बघून ती हंसखुशी झाली. ओटीवर पुढं येऊन मोठ्यानं ओरडली, ' जाकीन, अग निघालीस कुठं तूं ?'

' वर ' आणि बोळकं पसरून जाकीन विचकट हंसली. ' आबांच्या सुने, तूं तरी बरी आहेस गो ?'

' कसली बरी ? रोजचा तर सीकपणा घरांत ' आतेबाई सावध होती. जाकीनला मुद्दामच ती खोटंनाटं सांगत होती. घ्या काय ? खरं सांगावं, तर थेरडीची नजर जायची. ' कधीं मी, कधीं हे, एकही दिवस कांहीं धड जात नाहीं.'

जाकीनचं तोंड वांकडं झालं. उसासत तिनं विचारपूस केली, ' पोरंबाळं तरी ?'

' दोनच. एक वेडसर आणि दुसरं रातांधळं. '

' अगोगो !' म्हातारी वर आकाशाकडे बघत हळहळली, 'गांवांत कोणाची कांहीं बरी बातमी कानावर येत नाहीं बघावा तो अडलेला नाडलेला. आबाच्या सुने, कायतरी घाल गो जाकीनला. बुंदीचा लाडू नाहींतर कडबोळीं टाक हातावर. देव बरं करील ! तुझ्या हातचं नाहीं गो खाल्लं कधीं. मुद्दाम साद घालून द्यायची तुझी सासू. गेली बिचारी. वाईट झालं !'

' नाहीं ग जाकीन, घरांत कांहीं नाहीं. नुसता खडखडाट. आमचीच पंचाईत. उपास पडतात. आहे एक-दळिद्र. तें तर देवां येत नाहीं.' आतेबाईनं कळवळून सांगितलं. तिच्या जिवावर आलं होतं. पण निरुपाय होता. स्वतःसाठीं नाहीं. पण मुलांसाठीं, संसारासाठीं खोटं बोलणं तिला भागच होतं.

' वहिनीबायच्या घराचं मातेरं केलंस. दाजीला सांग हें.' असं म्हणून जाकीननं पाठ फिरवली. थेरडी चिडली होती, नाराज झाली होती. सुनेला तिनं म्हटलं, चल गो. बामणंसुद्धां भिकारडीं झालींत.'

जाकीनची सून मात्र फिदीफिदी हंसत होती.

ही पीडा एकदां वाटेला लागली तसा आतेबाईनं सुटकेचा निःश्वास टाकला. ओरडून सांगितलं, ' हिला संभाळून ने ग !'...

आणि वाटतं आंत दाजी नाबराच्या हें कानांत पडलं. तसा तो आपल्या खोलींतून बाहेर आला. त्यानं बायकोला प्रश्न केला, ' कोणाला सांभाळायला सांगतां ?'

' ती जाकीन, बरल्यांव खिस्तांवाची हो ! नव्वद वर्षांची ही थेरडी पोरासारखी उडथा मारीत डोंगरावर निघालीय.'



'आणि तुम्ही ? तिकडेच निघालांत वाटतं ?' दाजीनं हंसून विचारलं.

आतेबाईला चोरल्यासारखं झालं. एकदम जाब सुचेना. ती नवऱ्याच्या तोंडाकडे बघत राहिली. उगाच पदर नीट करीत खालच्या स्वरांत तिनं म्हटलं, ' जाऊन येईन म्हणतें. पोरीची हौस. '

तिची तयारी झालीच होती. वासंतीचा आग्रह-पैठणी नेस म्हणून. आतेबाईनं नाहीं मानलं. पैठणी नेशीन तुझ्या लग्नांत, असा लेकीला जाब केला. आणि जरीच्या पोताची जुनी साडीच पसंत केली. अंगावरं दागिनेसुद्धां मोजके. बोरमाळ, पाटल्या आणि नथ. नाहींतरी नटण्या थटण्याचं कां आतां तिचं वय राहिलं होतं ? तें होतं वासंतीचं. तिनं करावा काय हवा नको तो थाटमाट ! आंतल्या खोलींत पोर तच करीत होती. केव्हांधर तिची तयारी चालली होती. संपतच नव्हती. आतेबाई आपल्या लेकीची वाट बघत बाहेर उभी होती.

अनुक्रमणिका

'जा, जा ! खुशाल जा !' दाजी नाबरानं म्हटलं, 'पण एक करा. येऊन सगळा रिपोर्ट द्या आम्हाला.'

'म्हणजे हो काय ? तुम्ही नाहीं येणार ?'

'कारण नाहीं.'

'तीनतीनदां निरोप धाडूनसुद्धां.' आतेबाईचा त्रागा सुरू झाला.

'हज्जारदां निरोप आला तरीसुद्धां नाहीं.'

'हूंः !'

'हूंः काय ! कळतं काय तुम्हांला !' दाजी उसळला.

'कांऽहींऽ कळत नाहीं. आणि जळ्ळं तेंच बरं.!' आतेबाईनं फणकाऱ्यानं म्हटलं.

'तेंच बॅरं !' दाजीनं तिला वेडावलं. 'हें बोला असंच. आणि बघत बसा.'

'तुम्हीतरी दुसरं काय करतांहात हो? घरांत, बायकोपुढं—'

'आतेबाई—'

'पण आतेबाई गप्प नाहीं झाली. तिनं सांगून टाकलं. नवऱ्याची भीडमुर्वत राखली नाहीं. 'असेल धमक तर तिकडे चारचौघांत डेप्युटी मिनिस्टराला सांगा जा.'

'म्हणजे तुमचं मत, सावंताला मी घाबरतों ?' दाजीनं विचारलं आणि तो मोठ्यानं हंसला.

आतेबाईचं बोलणं त्याला अगदींच विसंगत अन् पोरकट वाटलं. रागाला येऊन ती कांहींतरी बोलत होती. तोंडाला येईल तें. विचार न करतां.

'घाबरत नाहीं. लाजतां.'

या उत्तराचं दाजीलाच अजब झालं. 'लाजतों ! ते कां बुवा ?'

'तो मोटा झाला नं, मिनिस्टर !' आतेबाईनं सांगितलं.

'मिनिस्टर मोठा माणूस असतो हें मात्र आतां तुझ्याकडून कळतंय् खरं.' तिच्या नवऱ्याला कबूल करावंच लागलं.

'तुमचा हा वस्ता सावन्त कालपरवांपर्यंत हिथं, या ओटीवर पडलेला असे. आला कीं महिना महिना मुक्काम. घरीं खायची मारामार पडे. म्हणून घालायचा खेटे. जळक्या विड्या फुंकून ओटीवर घाण मात्र करून ठेवी. आणि उभा दिवस ती वटवट. डोकं उठवी. बाहेर तुमचं, आणि घरांत आमचं.'

काय उपयोग ? कोरडा तो कोरडाच !' दाजी फुकट हळहळला.

आतेबाईचं पुराण चाललंच होतं., 'बाकी गोडबोले हो पक्का ! आणि तसा कामसाधू ! सांगायचा कसा–आतेबाई, तुमच्या हातच्या जेवणाला लई मजा !'

'तशा तुम्ही खुश, काय ?'

'तुमजा चेला ! डेप्युटी मिनिस्टर झाला. खरं म्हणजे, तुम्हीच अधिक खुश असायला हवं !' आतेबाईनं उलट टोमणा हाणला.

'आतेबाई, माझा चेला कधीं डेप्युटी मिनिस्टर होणार नाहीं. सत्तेपासून दूर राहील.' दाजी सांगूं लागला.

'झाला तर खरा !'

माझा चेला महात्माजींच्या शिकवणीला डांबर नाहीं फांसणार.'

'तुम्हीं म्हणा तसं !'

'गांवच्या सुखी संसाराला सुरंग लावणाऱ्या या खाणींच्या भानगडींत माझा चेला पडणार नाहीं. प्राणपणानं विरोध करील. तुमचंच बरोबर आहे आतेबाई ! वसंतराव मोठे झाले. त्यांचे विचार वाढले, आचार बदलले, आणि विकार–विकार बळावले असतील ! दुसरं काय ?' येरझारा घालतां घालतां मध्येंच थांबून दाजी नाबर म्हणाला तो नुसताच शुष्कपणं हंसला. आणि पाठीमागं हात घेऊन पुन्हा येरझारा घालूं लागला.

आणि अशांत वासंती लगबग आंतून आली. नाहींतरी उशीर तिनं केला होता. वेशभुषा करायला इतका वेळ घेतला. आणि आतां मात्र तिला घाई झाली होती. चप्पल पायांत अडकवली आणि आईला तिनं म्हटलं, 'चल ना ग आई !'

जशी काय आतेबाईमुळं तिला खोटी झाली होती.

फेऱ्या थांबवून दाजी लेकीच्या पुढ्यांत येऊन उभा राहिला. हंसून म्हटलं, 'अग जाशील ! पोरी, बाकी सोलापूरला राहून पार बदललीस ग !'

खरं होतं.

वासंती पूर्वींची राहिली नव्हती. पहिली करनकरी, परकरी पोर आतां एकदम मोठी झाली होती. दिसत होतीही खूप सुंदर. शरीराला आकार आला होता. अवयव भरूं अन् ठरूं लागले होते. गर्द काजळी डोळ्यांत भाव खेळूं लागले होते. गोऱ्या गोजिऱ्या गालांवर रंग चढूं लागले होते. अर्धवर्तुळासारख्या रेखीव भुवया, जरा नकटंच नाक अन् इवलीशी जिव्हणी–कोणाचीहि दृष्ट लागावी अशीच सुरेख होती पोर. आणि याची जाणीव वासंतीलाहि होती.. दृष्ट नाहीं, पण लोकांची दृष्टी मात्र आपल्यावरच खिळावी म्हणून तिची धडपड सुरूं झाली होती. सोलापूरला राहून या शास्त्रांत पोरटी बाकी खूप तयार झाली होती..

आतांसुद्धां तिनं जाम रूबाब केला होता. सिल्कचं पिवळं पातळ. तलम, चौकडीचं. पोटिमा फॅशनचा तंग जर्द पिवळा ब्लाऊज. उजव्या हातांत सातआठ बांगड्या, पिवळ्याच. डाव्या हाताला बायकी

घड्याळ. गळ्यांत एकच लॉकेट. मागं पाठीवर वेण्यांचे दोन शेपटे आणि सोनचाफ्याचं फूल.

या असल्या गोष्टी दाजी नाबराच्या सहसा लक्षांत येत नसत. त्याच्या दृष्टीनं त्या महत्वाच्याही नव्हत्या. सोलापूरहून आल्याला वासंतीला तरी पंधरावीस दिवस झाले असतीलच. पण इतक्या दिवसांत कधीं नाहीं तें आज त्याचं लक्ष गेलं. आणि तसा तो लेकीकडे बघतच राहिला.

चेष्टेनं दाजीनं बायकोला म्हटलं, 'अहो तुम्ही तरी सांगा, ही ही पोर आपली वासंतीच काय ?'

'होय, वासंतीच ! आणि तुमचीच बरं !' आतेबाईंचे कौतुकाचे उद्गार.

'अच्छा ! पण मला मात्र ही कोणी वेगळीच दिसते.'

'हें हो काय दाजी ? मी नाहीं जा !' मनांतून खुश, पण वरकरणी मात्र वासंतीनं खूप नाटक केलं.

तुला नक्की ओळखणं कठीण झालंय पोरी ! एकदम साखर-कारखानदाराची नात झालीस ग. काय ? ' दाजीची थट्टा संपत नव्हती.

आणि तिचा राग आला आतेबाईला. तिनं भडकून म्हटलं, 'आहेच.'

'आहे खरी !' दाजींनंही दुजोरा दिला. 'पण माझीसुद्धां लेक आहे.'

'मग नेसवा हीं पोतेरीं तिला. अंगावरच्या लुगड्यावरून दोन्ही हात नाचवीत आतेबाई ओरडली.

साधं थट्टेचं बोलणं. कारण नव्हतं, आणि तरीही आतेबाईनं तिढा अर्थ घेतला. तिला वाटलं, नवरा मुद्दाम घालून पाडून बोलतो आहे. कधींमधीं हें असंच व्हायचं. आतेबाई नुसतं माथं फिरवून घेई.

दाजी आईला आतां भडकून बोलतील आणि मग दोघांची चांगलीच जुंपणार, या कल्पनेनं वासंती मात्र कावरी बावरी झाली. कधीं नाहीं ती आई तिच्याबरोबर आज बाहेर निघाली होती. तर–तर दाजींनी निष्कारण हें कांहीं काढलं.

नशीब ! म्हणूनच वर देवळांत जोराचा गिल्ला झाला. 'पुंडलीक-वरदा हारी विठ्ठल !' आणि मागोमाग वानरांसारख्या उड्या मारीत पोरं बाहेर पडली. टाळ वाजवीत, मृदंग बडवीत. सरळ रस्त्यानं जातील तर नांवाला काळिमा लागेल ! तीं शिरली झाडाझुडपांत, जवळची वाट म्हणत समोरची दरड चढूं लागलीं. हांकाटी अन् हूयों चाललीच होती. मध्येच आठवण झाली कीं सगळे एकच गळा काढीत-

'भले तरी देऊं सोडून लंगोटी
नाठाळाच्या पाठीं घालूं काठी—'

तिकडे लक्ष वेधलं आणि तसा दाजी नाबर बायकोवरचा राग विसरला. तोंडचं वाक्य त्याच्या तोंडातंच राहिलं. पोरं बघतां बघतां वर रानांत दिसेनातशीं झालीं.

दाजीनं आतेबाईला प्रश्न केला, 'या वानरांचं काय चाललं आहे ?'

'वानरं नाहीत. नाबरंच आहेत तुमचीं.' त्याच्या बायकोनं जाब दिला. जरा घुश्श्यांतच.

'अहो, पण तुमच्या या नाबरांचा काय बेत आहे ?'

'जळ्ळा त्यांचा बेत ! गेलेत नाचायला मिरवणुकींत.'



वासंतीनं आईचा पदर ओढून हळूंच म्हटलं. 'आई, चल ना ! दाजीशीं वाद घालत बसलीस तर तिकडे समारंभ आटपूनसुद्धां जायचा !'

'आणि आटपेना ? मला नाहीं यायचं !' आतेबाईनं मोठ्यानं सांगितलं.

'म्हणजे ?' सकाळपासनं सारखं टुमणं लावून वासंतीनं आईला तयार केली होती. सगळं अगदीं नक्की झालं होतं. आणि आतां आयत्या वेळीं हें असं !

'म्हणजे तेंच ! बच्छी, अगो हें बायकांचं जिणं. काडीचंसुद्धां स्वातंत्र्य नाहीं.' आतेबाईनं मनची व्यथा सांगून टाकली.

वासंतीनं नाराजीनं मान उडवली आणि दाजीकडे अर्थपूर्ण कटाक्ष टाकला.

पण जरूर नव्हती. घरच्या राजकारणांत दाजी अनभिज्ञ नव्हता. तो तवातावानं म्हणाला, 'पोरी, माझा संबंध नाहीं.'

'कांऽहीं संबंध नाहीं बरं तुमचा.' आतेबाई धुसपुसत पुटपुटली.

'उलट मी म्हणतों खुशाल जा तुम्ही '

'खुशाल ज्जा !' त्याच्या बायकोनं हेल काढीत री ओढली. आणि सवाल केला, 'तुम्ही येत नाहीं तर कशी जाऊं ? सांगा ना ?'

'अहो, माझ्याशीं तुमचा काय संबंध ? तुम्ही जा आपल्या.'

'काय संबंध ? बायको मी तुमची.' आतेबाई उसळली. 'तुम्ही नाही आणि मी मात्र जाते. गांवांत लोकांना बोलायला बरं ! दाजी नाबर खरा हो, नाही आला. त्याची बायको मात्र बरमाई कशी मिरवीत होती. हूं: ! कळतं मला. वेडी नाही आतेबाई !'

तिच्या वैतागाच्या बोलण्याचं दाजीला हंसूंच आलं आणि बरंहि वाटलं. वासंतीला त्यान म्हटलं, 'पोरी, पळ तूं. तुझ्या आईचं लक्षण बरं नाहीं दिसत.'

वासंतीला तें पटलं होतं. पण तरीहि तिनं तोंड वेंगाडलं, 'हें काय ग आई ?'

'आई कशाला ग हवीय्? जा एकटीच. लहान नाहीस आतां' आतेबाईनं तिरसटपणं म्हटलं.

वासंतीचं तोंड एव्हढंसं झालं. पोरं गोरीमोरी झाली. खालीं मान घालून पदराशीं चाळा करीत ती उभी राहिली.

तसा दाजी नाटरमध्यें पडला. तो लेकीला म्हणाला, 'जा पळ बघूं. उशीर होईल तुलाच. आणि मनाला लावून घेऊं नकोस. नाहीतर या घरांत मुळीं रहायला नको!'

'शेवटीं वाईट मीच.' आतेबाईचं जाहीर प्रतिपादन.

'कोण म्हणतो? अहो, वाईट आम्हींच,' इति दाजी.

'तुम्ही नाही. मीच!'

'ज्यांत त्यांत तुमचा आपला हट्ट हा असा.'

'आणि तुमचं? तत्व, ज्यांत आणि त्यांत...'

आणि मग हा वाद पुढें ऐकायला वासंती थांबली नाही. पायऱ्या उतरून वर देवळाकडे जाणाऱ्या पांदीनं हंसत हंसत ती चालूं लागली.

## ११

दुपार टळली होती. उन्हं आखडीं झालीं होतीं. सावली पाठीशीं लागली होती. समुद्राचा खारा वारा थेट अंगावर भिडत होता.

रानांत आली आणि वासंती चट् शाळकरी पोर झाली. लहरी, स्वच्छंदी, अल्लड. इथं तिला बघणारं कोणी नव्हतं. आणि विचारणारं देखील. एकटीच होती ती – बिलकुल एकटी. बरोबर कोणी, कोणीसुद्धां नव्हतं—

आणि तसं आपलं बाळपण तिला आठवलं. चोरपावलांनीं शाळेच्या दिवसांच्या त्या आठवणी डोळ्यापुढं फेर धरून उभ्या राहिल्या. डोंगर उतरून खालीं कुळकर्ण्यांच्या आवाठ्यांत शाळा होती. गांवांत शाळा ही एकच. आणि शाळेंत शिकणारी मुलगीसुद्धां तीच एक. तेव्हां तिला एकटं जावं लागे. इतर पोरांत मिसळणं अशक्य होतं. उगाच तीं चिडवित—पुरुषांत बाई लांबोडी, भाजून खाते कोंबडी. छीः! ती लांबोडी नव्हती. आणि कोंबडी खायला कुळवाडी पण नव्हती.

रानांतल्या प्रत्येक काजूच्या झाडाच्या बोंडूचें रंग तिला पाठ होते. करवंदीच्या जाळी कुठंकुठं विखूरल्यात तें माहित होतं. हिवाळ्यांत पहाटे भरकाळोखांत सुरंगीच्या कळ्यांसाठीं इथंच वर रानांत ती धांव घेई. खांचाखळग्यांनी अन् किरड्ं–जिवाणूंनी भरलेल्या या रानानं तिला कधीं दगा दिला नाहीं. नीट जोपासली, खेळवली, वाढवली. सांजला शाळेंतून परत येतांना तळपीच्या या उतारावर पाणलोटासारखी ती अवधाण धांवत येई. तरी रस्त्यानं तिला कधीं पांडलं नाहीं. तिच्यासाठीं तो गादीसारखा मऊ पडे. तिच्यासाठीं साहीं ऋतूंत रान नाना रंगी, विविध गंधी फुलांची सरांस पखरण करीत राही. पावसाळ्यांत तर परत बहार-- रूपेरी निर्झर खळखळ वाहत. तेरड्यांचे लाल टचटचीत ताटवे तालांत डुलत. हरणीचीं पिवळीं फुलं सोन्याचीं लयलूट करीत. भातशेतं भारावून संथ हेलावत. अवतींभवतीं, बघावं तिकडे हिरवळीचे गार हिरवे गालिचे! बघूनच डोळे निवत, अंतर्मन तृप्त होई.

शहरांत राहून वासंती बाकी खूप बदलली असेल—नव्हे होतीच. पण ते दिवस अजूनही तिच्या अंतःकरणांत रेंगाळत होते. आजही त्या आठवणी टवटवीत ताज्या होत्या. ती रानाला विसरली नव्हती. रान तिला विसरलं नव्हतं. अर्धे पिक्या करवंदांचा आंबटपणा आजही तिच्या ओठावर होता. साखरी काजीचा लालीलाल बोंडू आजही तिला हवाहवासा वाटत होता.

रस्त्यानं तिला रानाच्या हवालीं केली. आणि हंसत तो बाजूला झाला. भटकेल, भटकेल, आणि पुरे झालं कीं येईल परत! रस्त्याला हें ठाऊक होतं. रानांत वासंती नक्की वाट चुकत नाहीं, त्याला खात्री होती. बालपणीचें जिवलग सोबती भेटतांच वासंती भारावल्यासारखी झाली. आणि वेडी स्वतःला विसरून गेली. बरं, हें प्रेमसुद्धां शब्दांनी व्यक्त करतां येत नव्हतं. तिच्या सौंगड्यांना माणसाची भाषा कळत नव्हती. त्यांची भाषा अधिक सोपी, सरळ. पण आतां इतक्या वर्षांनी आणि शहरांत राहून वासंती ती विसरली होती. आठवायला तिला वेळ लागत होता.

असा बराच वेळ गेला. वासंतीला शुद्ध नव्हती. ती स्वच्छंद भटकत होती. करवंद गोळा करीत, झाडावरचे काजू पाडीत...

...पान ५२ वर






हा प्रश्न ऐकून मी लाजलो. लाजूं नये इतका लाजलो. 'जागीं झाली डोळ्यामंदी लाज' अशा अवस्थेंत मी कितीतरी वेळ मुग्ध होतो. हेडक्लार्कनी मला या मुग्धाअवस्थेंतून बाहेर ओढून काढले,

'गायतोंडेऽऽ, अरे लाजतोस काय रे? नुसता लग्नाचा विषय काढला कीं लाजतोस! काय म्हणावें तुला? अरे, कशासाठीं रजा हवी तुला?'

मी कसेंबसें लाजायचें थांबून म्हणालो,

'प्रेम करायला!'

'मेऽऽल्या, काय म्हणालास?' चितळे साहेबांनी आपल्या खास कोंकणी शैलींत मला झिडकारलें. इतकें झिडकारलें कीं, मी जणूं त्यांच्याशींच प्रेम करणार होतो.

'या रजेंत मी प्रेम करणार आहे!' थर्ड-प्लॅनमधील एखादी मोठी योजना सांगावी तितक्या निलाजरेपणानें मी म्हणालों.

घाईघाईनें पेपरवेट माझ्या दिशेनें फेंकून त्यांनीं गड्याला हांक मारली,

'अरे, बगाराम, याला मेडिकलला नेऽरे!'

त्यांचा पेपरवेट मला लागूं नये तिथें लागला आणि मी खरोखरीच मेडिकलला जनरल वॉर्डांत येऊन दाखल झालों. आणि पहिलें प्रेम मला तिथें हॉस्पिटलमध्यें झालें. तिथल्या सिस्टरच्या 'कवितेहून कोवळ्या' स्पर्शानें माझ्या शरीरावर रानगवती शहारे उठूं लागले. तिच्या ओठांच्या शिंपल्यांतून महाबळेश्वरी धुकें सांडताना मला चक्क जाणवूं लागलें. वास्तविक हें 'सांडणें' आणि हा 'स्पर्श' मला कांहीं समजले नाहींत. पण असें मला पहायला आलेला रघूच म्हणाला—माझें दुखणें वाढतच गेलें. पुढें दोनच दिवसांत होऊं नये तें झालें, किंवा व्हायचें तेंच झालें. एक नर्स माझ्या आसपास फिरकेनाशी झाली—(एकदां अंधारांत नर्स समजून मी खुद्द सिव्हिल सर्जनलाच मिठी मारली, तेव्हांपासून डॉक्टरहि फिरकेनासें झाले.) सिव्हिल सर्जननें मला स्ट्रेचरवर घालून 'दुसरीकडे सोय बघा' असें चक्क सांगितलें. 'हॉस्पिटलमधल्या नर्सला सिस्टर म्हणतात, वाईफ नाहीं...' असेंहि पुढें ते म्हणाल्याचें समजलें.

महिन्याभरानें पुन्हां ऑफिसमध्यें खालच्या मानेनें प्रवेश केल्यावर हेडक्लार्कनी जवळ बोलवून घेऊन मला सांगितलें,

''अरे गायतोंड्या, आपलें मरणसुद्धां सरकारी नियमानें लिहिलें आहे. त्याच्या आंत मरायचें नाहीं आणि त्याच्यापुढें जगायचें नाहीं. सरकारी नियमापेक्षां जास्त प्रेम केलेंस म्हणून असें झालें बरें. जा पाहूं काम कर.'

कसेंतरी आठ दिवस मी काम केलें. माझ्यांतला एकदां प्रेम झालेला शिरीं (किंवा फरहाद, किंवा शिरींफरहाद, किंवा शिरींफरहाद, किंवा द शिरींफरहा...) फिरसें गूँज उठा! त्याची उलझन वाढली. आणि किसिकी जुदाईमें आँसू बहानेवाला वो फिर किसिकी मुहोब्बतमें गिर गिया...

एक दिवस ऑफीस सुटल्यावर मला चक्रावून टाकणारा साक्षात्कार झाला. ऑफीसमधील कु. अंबू घामगळे (टायपिस्ट कम् क्लार्क टू ओ. एम्.) माझ्याकडे आपल्या जाड फ्रेममधून चोरट्या नजरेनें पाहती झाली. तिनें आपल्या गालाच्या कलिंगडांतून हास्याची सुरी फिरवली. 'म्हंजे' ती हंसली. (दात मोगऱ्याच्या कळ्यासारखे दिसतात, हें तिच्याविषयीं मला प्रकर्षानें पटतें.) 'प्रेम करा' सप्ताह अक्षरशः अंगाशीं आल्यानंतर थकलेल्या मीनें 'हंहि नंसे थोडके' म्हणून तिचें हास्य ॲक्सेप्ट केलें. मीहि हंसलों, माझा अधःपात सुरू झाला.

पुन्हां ती हंसली.

पुन्हां मी.

पुन्हां ती.

पुन्हां मी.

पुन्हां ती.

पंधरावीस मिनिटांच्या या हंसाहंशीच्या कार्यक्रमानंतर हातांतली तांबड्या-पिवळ्या मण्यांची पर्स आपल्या जाड आणि सांवळ्या बोटांनीं. (मला आतां ती सावळी वाटूं लागली. १५ हंशांत माझ्या भावनांचा रंग बदलूं लागला.) गोंजारत तिनें मला विचारलें,

'हीः हीःहीः घरी निघालांत वाटतं!'

ऑफिस सुटल्यावर माणसें मसणांत जात नाहींत हें वास्तविक त्या गाढवीला माहीत हवें होतें. पण माझ्या हातांत आतां कांहीं राहिलें नव्हतें. मी पंधरा हंशांची दाद घेतली होती. देणेकऱ्यासारखा हंसत मी बोललो,

'ह्यः ह्यः ह्यः, जाणार होतो.

'म्हणजे?' पर्सचा गालाशीं काटकोन आणि सर्वांग अष्टकोनी करीत तिनें विचारलें.

'ह्यः ह्यः ह्यः ह्यः' (खिदळणें पहिल्यापेक्षां लांबलें) 'म्हणजे आतां जाणार नाहीं...'

'कां?'

''तुम्हीं भेटलांत ना! हीः हीः हीः!'

'इश्य तुम्ही काय बुवा साहित्तिक!'

साहित्याचा इथें काय संबंध हो! पण तिनें उपरोक्त वाक्य 'अंग' घुसळून असें कांहीं म्हटलें कीं, तेवढी बेहोषी मला दुसऱ्या प्रेमांत पडायला पुरली. पुढें कांहीं दिवस मी अगदींच ताळ सोडला. (मी सोडलेली अशी ही क्रमानें तिसरी गोष्ट—मॅट्रिकला प्रथम गणित, हॉस्पिटलमध्यें लाज आणि आतां ताळ सोडला.)

'अंबे, तुजवांचून कोण पुरविल आशा' या (भक्ति) भावनेनें मी तिला वेळीअवेळीं घेऊन फिरूं लागलों आणि आसपासची मंडळी बिब्बा घालता येईना म्हणून अक्षरशः चुना घालूं लागली.

'काय हलकट कारटें आहे हो!'

'त्या गायतोंड्याच्या पोरांत कांहीं अर्थ नाहीं.'

'बापावर गेलंय कार्टें, थेरडा बघितलात ना, डोक्याचा कॅरम बोर्ड झालाय् तरी कलप लावून हिंडतंय्!'

'काय त्याच्या आयला, पोरगी तरी काय पाहिली आहे!'

'ध्यान आहे, मेली. म्हणा ह्या हेंगाड्यांत तरी काय आहे!'

हेऽऽ उद्‌गार सर्वत्र ऐकूं येऊं लागले. परिस्थिति फारच चिघळली आहे, गनीम तावांगपर्यंत येऊन पोंचला आहे हें मला रघू एक दिवस तावातावानें मजकडे आल्यावर समजलें. कशाचाहि संदर्भ न देतां रघ्यानें मला एकच सवाल केला,

'मन्या कुबेरचें काय झालें समजलें?'

'काय झालें?' मन्याविषयीं अत्यंत सुतकी विचार डोक्यांत उभे राहिले.

'काय झाले!' तोच प्रश्न पुन्हा मला विचारण्यांत रघूनें काय साधलें मला कळलें नाहीं, 'काय झालें नाहीं विचार!'

'म्हणजे?' मी जास्तच घाबरा झालों.

'म्हणजे काय, विचार ना मला!'

'पण म्हणजे काय?'

'तू मला विचार.'

त्यानें फारच आग्रह धरल्यावरून मी त्याला विचारलें, 'मन्या कुबेरचें काय झालें नाहीं?'

'काय झालें नाहीं! त्या भ्याँचोदनें त्या विमल जगदाळेला कुठेंतरी परगांवी नेऊन लग्न केल्याचें जाहीर केलें. लग्न झाल्यावर पुस्तकांतला अनुभव घ्यायचा ठरवून खुळ्यासारखा तिला घेऊन पावसांत भिजला चारुदत्तासारखा.





अनुक्रमणिका

पुढें त्या गारठ्यानें ती नाजूक वसंतसेना आजारी पडली आणि सपशेल मेली. तिच्या आई-वडिलांनीं त्याच्यावर खुनाचा आरोप ठेऊन केस भरली आहे...'

या सगळ्या गोष्टीला मी काय करणार, असा चेहरा करून मी रघूकडे पाहात होतो. त्याचें सांगणें झाल्यावर मी 'अरे रे रे, वाईट झालें' इतकेंच म्हणालों. तशी नरडे फाटेपर्यंत रघ्या ओरडला, 'मूर्खा, मी हें काय मजा म्हणून सांगतोय ! सोडणार आहेस कीं नाहीं अंबीचा नाद ?'

रघ्याच्या मात्र नादी लागण्यांत अर्थ नाहीं, हें स्पष्ट कळूनहि मी त्याला म्हटलें, 'पण मी तिला पावसात भिजवणार नाहीं !'

'अँ हॅऽऽ रे, गोपाळ' रघ्या 'गोपाळ' व 'सखाराम,' हीं नांवें शिवी म्हणून वापरी, 'तूं तिला संध्याकाळीं चौपाटीवर नेणार. आतां थंडीचा सीझन आहे. तिला थंडी होणार. त्यांतून एन्फ्लूएंझा, टाईफॉईड, न्यूमोनिया, डबल न्यूमोनिया होणार. फट् म्हणतां कांहीं झालें तर !'

रघ्याची अतीव दूरदृष्टि पाहून मला मात्र थंडी वाजून आली. ए. पी. सी.ची गोळी आणायला म्हणून मी तेथून सटकलो. गिरगांव नाक्यावर अंबू माझी वाटच पाहात होती. तिला घेऊन मी चौपाटीवर निघालों. सायंकाळची रम्य आणि कातरहि वेळ होती. रघूच्या बोलण्यानें मी थोडासा गंभीर झालों होतों. त्यांतून अंबूच्या घरच्या लोकांनीं तिचा गारुड्याचा खेळ केला होता. तिनें आपल्या पिताजींची समजूत काढण्याची पराकाष्ठा केली होती. 'पिताजी, पोपट वैसा नही है, पोपट वैसा नही है' असें माझ्याविषयीं तळमळून सांगितलें होते. पण मी 'वैसा' नसलों तरी तिचे पिताजी 'तैसे' होतें. तिला त्यांनीं ठिकठिकाणीं दाखविण्याचा सपाटा लावला होता. तीहि माझ्या बाजूनें (कित्येक दिवसांत) न बडबडता चालली होती. जड पावलानें (खरं म्हणजे हीं पावलें मला अजून पाहायचींत) आम्ही सुप्रसिद्ध टिळकांच्या पुतळ्यापलिकडे जाऊन बसलों. मावळत्या सूर्याला साक्षी ठेऊन, अंबूनें नरडें फोडून हुंदका काढला. तिच्या हुंदक्यानें सूर्य नारायणाच्या पोटांत सोनेरी गोळा उठला आणि तो डुबकन पाण्यांत बुडून गेला. मी इकडे तिकडे पाहिलें. आसपास विशेष कुणी नव्हतें हें पाहून सुस्कारा सोडला. अंधाराच्या काठावर आम्ही दोघेंच एकमेकांची मस्तकें कुरवाळत राहिलों. अंबू घोगऱ्या आवाजांत मला म्हणाली,

'राजूऽऽ' (इथें एक खुलासा आवश्यक आहे. आम्ही नुकताच 'आवारा' सिनेमा पाहून आल्यामुळें ती मला 'राजू' व मी तिला



स्वगत

'नीता' म्हणत होता. माझें गायतोंडे आणि तिचें घामगळे हें आडनांव कृपया इथें आठवूं नये.)

पुढें कंटिन्यू...

'राजूऽऽ' तिनें हंबरा घातला.

'अंबूऽऽऽ' नाहीं म्हटलें तरी मीहि थोडा गहिंवरलों.

'राजूऽऽ आतां आपलें कसें होणार रे ?' (वास्तविक कांहींहि होणार नव्हतें,) पण माझ्यांत त्वेष आला. मी तिचा हात हातांत धरीत गरजलो,

'नीताऽ, या मावळत्या सूर्याच्या साक्षीनें सांगतो कीं, नीता, हा गायतोंड्यांचा राजू तुझ्याशीं मनानें लग्न लावीत आहे. चल तोड ही बंधनें...'

मी तिला उगाचच वाळूंतून फराफरा ओढत नेलें. ती ओरडली, राजन, पुढें समुद्र आहे...'

'कोण राजन् ?' मी न समजून ओरडलो. आणि नंतर ओशाळून पुन्हां पुतळ्याजवळ येऊन तिच्या मस्तकाला खांदा देऊन बसलों.

इतक्यांत पुतळ्याच्या बाजूनें कुणाचीशीं पावलें वाजली म्हणून मी पाहिलें. मिस्टर अँन्ड मिसेस गुप्ते खिदळत आमच्या दिशेनें येत होते. समोरचा समुद्र आणि अंधार डोळ्यांपुढून गरागरा फिरून उलटा हंसत उभा राहिला. मी अंबूला दूर ढकलून ओरडलों,

'काढ सखे, गळ्यांतील तुझे कोळशाचे हात । पुतळ्याच्या पलिकडे उभे वडिलांचे दूत ॥ असें म्हणून मी वाळूंतून पळूं लागलों. पण गुप्ते चौपाटीवर रोज वाळूंतून पळण्याची प्रॅक्टीस करायलाच येत असावेत. मिसेस् गुप्त्यांनीं अंबूला आणि मिस्टर गुप्तेंनी मला अवघ्या दोनच झापेंत धरलें आणि ज्याचें वंदनीय चरण माझ्या कमरेंत बसणार होते त्या माझ्या वडिलांपुढें उभें केलें. (खरें म्हणजे आडवें केलें) तीर्थरूपांच्यापुढें मला आदळून ते ओरडले,

'ह्या पोपट्याला पिंजऱ्यांत टेवा. सगळी मुंबई शेण घालते आहे तोंडात. (मुंबईत मला तरी अजून शेणाचा 'शीन' दिसलेला नाहीं.) अजून 'विजार बांधायला येत नाही–(कुणाची हा प्रश्न इथें महत्वाचा–) तर मुंबईतल्या पोरी कुरवाळत समुद्राकाठीं सावरकरांसारखा बसतोय्...'

'कोण विनायकराव ?' वडिलांच्या चेहऱ्यावर समुद्राएवढें आश्चर्य होतें.

वास्तविक सावरकर समुद्राकाठीं मुली घेऊन केव्हां बसले होते हा प्रश्न अराजक माजविणारा आहे. पण गुप्तेंना तसें मुळींच म्हणायचें नव्हतें. ते कट्टर हिंदुत्ववादी होते. 'शिवाजी म्हणतो' म्हणल्याशिवाय तें मिसेस गुप्तेंबरोबर बोलायचेदेखील नाहींत. बाकीचे दूरचें. त्यांना असें म्हणायचें होतें कीं, 'सागरा, प्राण


अनुक्रमणिका

स. न. वि. वि.

पूर्वी बोस्टन म्हणजे एक द्विपकल्प होतं. हल्लीच्या आकाराच्या एक तृतियांश.

हें एक सुंदर शहर आहे. गंभीर, शिस्तप्रिय, मोठ्या घराच्या चालीरीती असलेलं.

१९ व्या शतकाचं इथं वर्चस्व आहे. घरं जुन्या पद्धतीची. इथल्या बंदरावरील पुलाच्या कमानी लहान लहान दिव्यांनीं रात्रीं शोभिवंत दिसतात. वाटतं, बंदरानें सोनेरी कंबरपट्टा बांधलाय.



बोस्टन म्हणजे केंब्रिज आहे. आणि केंब्रिज म्हणजे हॉर्वर्ड आहे आणि हॉर्वर्ड म्हणजे सगळं कांहीं. अमेरिकेंतील सगळ्यांत श्रीमंत विद्यापीठ म्हणून बोस्टनला मान आहे. ह्या वर्षी विशेष संशोधनासाठीं ते ३ कोटी रुपये जादा खर्च करणार आहे किंवा ३० कोटीही असतील. फरक काय हो!

बोस्टनला ऐतिहासिक महत्त्व आहे. अमेरिकेंत चहाचा प्रचार इथून सुरू झाला. मागाहून कॉफीला राष्ट्रीय पेय म्हणून मान्यता देण्यांत आली.

क्रमशः

अनुवादक: दि. श्री. कराडकर

आस्ट्रेलियाचे सुप्रसिद्ध व्यंगचित्रकार श्री. जॉर्ज मोलनार यांची चालू असलेली—

हीच तीं व्यंगचित्रात्मक




वॉशिंग्टनः

स. न. वि. वि.

भिंती संगमरवरी आहेत. फरसबंदी ट्रॅव्हरटीन (एक चकचकित शुभ्र दगड) च्या आहेत. खिडक्या कांचेच्या. खांबावर 'मोझॅक' चें नक्षीकाम. जाडया कथलाचे दरवाजे आहेत. अध्यक्षांच्या ऑफिससाठीं 'महोगनी' वापरण्यांत आलं आहे. विलास, शोभा व सुख हें प्राप्त करण्यासाठीं कांहींही करण्याचं बाकी ठेवलेलं नाहीं.



मी हें whit House चं वर्णन करीत नाहीं तर Tnternational Brotherhood of Teamsters, Washington D. C. ह्या संस्थेच्या ऑफिसचं! थोडक्यांत लॉरी ड्रायव्हरांच्या युनियनचं हें ऑफिस आहे.

ही एक सुखी संघटना आहे. १ कोटी ८० लक्ष रुपये ह्याची वर्गणी जमते. ह्या पैशाचा व्यय कसा करायचा हीच फक्त त्यांची एक चिंता असते.

ओरगॉन व सीटल हे निर्जन प्रदेश सुधारण्यासाठीं ह्यांनीं पैसे 'ओतले' तेव्हां ही संघटना एकदम नांवारूपास आली.

पण असा खर्च करणें गैर आहे. 'सिनेट'नें चौकशी सुरू केली. संघटनेचे अध्यक्ष श्री. बेक ह्यांना घटनेचा दुरुस्त कायदा (क्रमांक ५) चांगला माहिती होता. ते गप्प बसले. Silence is golden. अनुनुकसानीबद्दल बेकना दोन कोटी रुपये मिळाले.

वॉशिंग्टन एक अलिशान शहर आहे. निग्रोंची संख्या गोऱ्यांपेक्षा जास्त आहे. ह्यामुळें कांहींजणांनां 'अल्सर'चा विकार जडलाय. त्यांच्यावर योग्य ते उपचार झाले पाहिजेत.

सुंदर बागा व आंखीव हिरवळी ह्यांनीं हा देश वेढला आहे. प्रत्येक ठिकाणीं सूचना आहेत :' No Short cuts Allowed.' पण ह्यांची कांहीं आवश्यकता नाहीं. कारण वॉशिंग्टन समाजसेवकांचं शहर आहे.

न्यूयॉर्कहून:

स. न. वि. वि.

इमारती उंचच उंच आहेत पण शेतं अगदीं लहान वाटलीं. कांहींतरी, कसलातरी गर्भितार्थ ह्यांत जाणवतो.

स्वतःच्या मालकीच्या जागेंत 'युनायटेड नेशन्स्' ची इमारत उभी ठाकली आहे. युनोला स्वतःचं असं वेगळं जग आहे. तिथें कायदेकानू चालतात ते त्यांनीं स्वतः निर्माण केलेले, दुसऱ्यांनीं निर्माण केलेले नाहीं.

प्रमुख हॉलमध्यें ग्रीक योध्याचा पुतळा खडा आहे. ताठ, उग्र आणि हातांतील भाला शत्रूवर फेंकण्याच्या तयारींत आहे असा. भाला मात्र नाहींसा झालाय्. (कदाचित् कुठल्यातरी शत्रूवर तो फेकला असावा.) बोटें उगाच शून्यांत पसरली आहेत. युनोसाठीं किती सुंदर चिन्ह (Symbol) आहे.

एका कोपऱ्यांत ६० फूट उंचीच्या तक्तपोशींतून एक 'पेन्डयुलम्' लोंबकळतोय; जणूं काय जग गोल फिरतंय हेंच दर्शवितंय्. कांहीं सभा गाजल्यानंतर जमलेले प्रतिनिधी लगबगीनें हा 'पेन्डयुलम्' पाहण्यासाठीं धांवतात.

पाहुण्यांना इमारत दाखविण्याचा धंदा इथें तेजीत असतो. दर पंधरा मिनिटांनीं सुंदर सुंदर चिनी, क्युबन व आईसलंड मुली इंडोनेशियन, पर्शियन, भारतीय, सिलोनी अशा चित्रविचित्र पाहुण्यांच्या तीस तीस जणांच्या गटाला इमारत दाखविण्यांत गुंग असतात. माणशीं ४ रुपये ह्या दरानें वर्षाकाठीं २६ लक्ष रुपये जमतात. आणि ही मिळकत इमारत साफसूफ करणाऱ्या नोकरांचा पगार म्हणून जेमतेम पुरावी.

*लग्न सरल्या अंधारां —— दत्ता कळवन*

खातां भाऊ बाहेर आला. चांभाराचा पोर टेचांत पडवीला येऊन विचारत होता. भिंती-जवळचा होलटा घेऊन भाऊ ओरडला, ' मायचा मारी पोर, चालता व्हतोस कां हान् डोचक्यांत ?' भाऊचा अवतार बघून पोर भेदरून पळाला. पराक्रमाच्या झिंगीनं भाकर चावत भाऊ घरांत यायला लागला. माज-घरच्या दारांत येऊन आयस उभी होती. लेकाच्या तोंडी शिवी आलेली आयशीला खपलं नाहीं. तोऱ्यांत भाऊ पुढं आल्याबरोबर दोन थोबाडांत दिल्या आयशीनं.

भाऊ तिरमिरला. त्याच्या हातांतली दुण-लेली भाकर उडाली. भाऊ रडत म्हणाला, ' अग्गे पन तो पडवीला आला व्हता. ' आय-शीनं सांगितलं, ' त्याला अंगणांत उबं ऱ्हायास सांगायचं. पण शिवी कां दिलीस बोल. आज येक दिलीस, उद्यां दोन देशील, परवां तीन देशील. ' खुटावळीनं गोंड चेचावी तशी आय-शीनं भाऊची हाडं नरम केली. तेव्हांपासून भाऊनं शिवी अशी कधीं दिली नाहीं.

सासरच्या चौयऱ्यावर कांहीं धुमसायला लागलं होतं. तिचे डोळे पाण्यानं भरले. तिनं पदरानं टिपले.

चटणी घेऊन ती चुलीजवळ आली. चटणीचा पडघा तिनं भानोशीला ठेवला. भिंतीसरशी उभी राहिली.

' पावनी काय ग तूं ? भाकऱ्या झाल्यायत तं मावलतच्या पडवीस न्हं आन पानं मांड,' सासूबायंनी भिवयी नाचवली .

झटदिशीं पोफळीसारखी ती लवली. खेपा टाकल्या. भाकऱ्या, गरे, चटणी सारं काय मावळतच्या पडवीला नेलं. मांडलं.

सासूबाय बाहेर आल्या आणि त्यांनीं वाड्याकडं हरळी दिली, ' गोंद्या...भुजारे... या रं बाबानूं न्हयारीला साऱ्यांनी.'

' येवडं आडं चेपताव आन येताव. बाकी सून आल्यापासनं आकांची कामं झटपट व्हतात.' भुजा म्हणाला.

' आरं जयरामदांचं धोरनच दांडगं,' गोंद्या बोलला आणि साऱ्यांनीं तर तर केलं.

---

***....तिला लग्नाचा मुहूर्त आठवला....मनांत ताशाचा गडगडाट झाला...***

***आणि नंतर जसं तें कार्ड तिच्या सासरहून आलं तशी तिला भोंवळ आली....आणि तेव्हांपासूनच ती....!***

---

तिला ओव्या येत होत्या पण गांवठी अंग-मन असूनहि शिव्या माहीत नव्हत्या. तिची आणि भाऊची इतर पोरं त्याबद्दल चेष्टा करा-यची पण दोघां भावंडांना त्याबद्दल कांहीं वाटत नसायचं.

सासरीं सासूबायंच्या तोंडूनहि तिनं कधीं शिवी ऐकली नव्हती. अतीच कांहीं घडलं तर जयरामरावांच्या तोंडून नालायक हा शब्द निघत असे. तिचा घोसुद्धां सासऱ्यांच्याच सांवलींतला. तिची आयस सांगायची, ' मान-साला इचार सुचला नाय का मानूस शिव्या देतं.' तिच्या मनांत आयशीचं बोलणं पक्कं ठसलं होतं.

जयरामरावांनीं हौशीनं मुलाचं लग्न कवळी-केतच बेगुन केलं होतं. मागारीण अेकटीच चुलीपाशीं खपायची. तिच्या मदतीसाठीं ही गोड चेहऱ्याची, गोड स्वभावाची मुलगी त्यांना पसंत पडली.

माहेरीं सासरीं सुखांत चाललं होतं. पण सुखाच्याहि मानेवर कसलं तरी भूत बसतंच.

जयरामरावांनाहि तें ऐकून बरं वाटलं. लोखंड पैसा ठेवून आढं चेपतांना भुजा म्हणाला, ' पेरतरला नत्याचा होव दे बाबा.' खालीं येऊन बाबीवर हातपाय धुतले.

नरसूरावांचा राघव जिनपैरा होता. खालीं आलेल्यांत राघव कुठं दिसला नाहीं म्हणून जयरामरावांनीं चौकशी केली. चिवारीची बिलं राघव गोळा करीत होता. जयरामरावांनीं त्याला पुन्हां साद घातली. येतो येतो म्हणाला. जयरामरावांचा मुलगा त्याच्याकडं कामाला गेला होता तें तो फेडायला आला होता.

राघवचं आजोळ जयरामरावांच्या सुनेच्याच माहेरगांवाला. अगदीं घराशेजारीं. राघवची आणि तिची ओळख तिकडची. राघव फार बोलका. त्याच्याजवळ गोष्टींचा खजिना दांडगा. तरी बोलण्यांत अघळपघळपणा नाहीं कां वाह्यातपणा नाहीं. मुखडा रुबाबदार. दंड पिळदार. तो आजोळी गेला-कीं सारी त्याच्या-भोंवतीं मिटाळायची. त्यांत तीपण. कुणाला त्याच्याबद्दल दुस्वास नव्हता, कपट नव्हतं.

त्याची आजी सारखी त्याला म्हणायची, 'राघ्या रे, तुझ्यासाटनं येक चुनचुनीत पोर बायको बगुन ठेवलेय.' आजी तिच्याकडे डोळे वळ-वायची. राघव हंसायचा. ती धूम पळायची तिथून. सारंच दोन क्षणांचं. सासरी आल्यावर तिला माहेरचे निरोप राघव पोचवायचा. तिचे निरोप माहेरीं न्यायचा. तो भेटला कीं तिला माहेरचं माणूस भेटल्यासारखं वाटायचं. तिच्या मनांत आनंदाची लूट व्हायची. मोकळेपणीं बोलायची. त्याच्या आजीची थट्टा तिला आठवायची. लाजरं पळणं बोळायची.

मागच्या बाबीवर राघव हातपाय धुवायला आला. एकटेपणाची भावना निर्माण झाली कीं माणसाला हजार गोष्टी आठवायला लागतात. जयरामरावांच्या सुनेचीहि तशीच दशा झाली. आयशीच्या आठवणींनं तिच्या मनांत फुगड्या मांडल्या होत्या. ती मागच्या दारीं उभी होती. तिनं पायरव हेरला. तिनं पाहिलं, तर राघव. तो त्याच्याच कसल्या विचारांत होता. तिच्या-कडं त्याचं लक्षहि गेलं नाहीं.

' लोकासनी आताशां मानसं पन दिसत नायत ' ती म्हणाली.

तेव्हां कुठं त्याचं तिच्याकडं लक्ष गेलं. तो म्हणाला, ' गजरा होय ?' आणि तो सूर्यफुला-सारखा हंसला.

'येवडं आपल्याच तालांत ?' तिनं विचारलं.

' हां. मानसानं सोताच्याच तालांत ऱ्हावं. लय गोडी असते.'

गजरा मुग्धशी हंसली.

' बसले सारे ?'

' हं. '

' मं बेगुनच आटपायस हवं. '

पाणी काढायला राघवनं काडणं उचललं.

' थांबा थांबा ' गजरानं सांगितलं आणि भिरी भिरी जाऊन घरांतनं तांब्याभर पाणी आणलं.

राघवच्या हातीं ती तांब्या देत होती तेव-ढ्यांत सासूबायंनी तिला साद घातली. पहिल्यानं तिला ऐकूंच आली नाहीं. पुन्हां जोरांत साद आली. तेव्हां गजरानं लगबगीनं ओ दिली. पदर सांवरून ती पुढं गेली.

सासूबायंचे डोळे बघूनच ती चपापली. ' घो हिकडं पानी मागतोय हातपाय धुवायस ' कमरेवर हात ठेऊन त्यांनीं ठकाऱ्यांत सांगिबलं.

' मी नाय ऐकलं ' खालच्या मानेनं गजरा म्हणाली.

'मी न्याय' ऐकलं...कसं कसं ! 'मी न्याय ऐकलं.'

सासूबायंच्या भजरला तिनं नजर दिली नाहीं. तिनं घोवाला पाणी आणून दिलं.

सासूबायंचे डोळे जहरानं कांठोकांठ भरले होते. त्या बडबडल्या, 'घो पानी मागतोय भान ही मागच्या दारीं...काय खोटं नाय शेजारनी पाजारनी गातायत तं.'

उन्हांत आयना तळपावा तसं तं बोलणं गजराच्या मनांत शिरलं. तिला खऱ्याखोटयाचा उलगडा झाला नाहीं. अधिकच ती भुचकळ्यांत पडली.

गडीमाणसांनीं गुपचूप एकमेकांकडे पाहिलं. आकांच्या बोलण्याचा कुणाला शेंडामुदाच कळेना.

हातपाय धुवुन राघव आला. न्हारीला बसला. म्हणाला 'मला टाकुन काय रं बसलेव !' तरी कुणी कांहीं बोलल नाहीं. सगळ्यांचा मुकपणा राघवला बोचला.

गजराचा घोपण न्हारीला बसला. जयरामरावपण.

'पोटभर खावा' सासूबाय म्हणाल्या.

'गरे लय गोड लागतायत आकानूं. कुनी सुननं गिजवलेले दिसतायत.' नेहमीच्या मस्करीनं राघव म्हणाला.

थरथरत्या डोक्यानं सासूबायंनी राघवपुढं डोळे ताणले. सगळी अशी काय वागतायत याचं राघवला नवल वाटलं. तुटकपणाच्या निबडुगावर त्याचं मन घासपटलं. सासूबायनी सुनेला सर्वांना गरे वाढायला सांगितलं. सर्वांना वाढतां वाढतां घोवाच्या पुढ्यांत गरे नाहींत याचं तिला भानच राहिलं नाहीं. माहेरच्या आठवणीचं इंद्रधनु तिच्या मनांत उगवलं होतं. राघवनं नको नको म्हणतांहि चार-सहा अधिक गरे गजरानं त्याच्या पानांवर टाकले.

सासूबाय जळफळल्या. त्यांच्या आयुष्यानं भयानक अवतार दाखवला. 'रांड ग जालीस. त्या मसन्याच्या पानांवर कश्या वल्येयस ? घोवाच्या पानांवर हाय काय ? येसवा ग येसवा', कडा कोसळावा तसे सासूबायंचे शब्द कोसळले. सारीजणं त्याखालीं दडपली गेलीच. पण नेंदामेंदा झाला.




प्रॉम्टिंग...

सासूबायंच्या तोंडून रांड आणि येसवा ! लाडक्या सुनेला ! धुमसत होतं त्याचा भडका उडाला. तिच्या हातांतला गऱ्यांचा हारा राघवच्या पानांवर गळून पडला...रांड ग जालीस... येसवा ग येसवा...चांगली माणसंपण शिवी देतात...अगदीं नको ती...स्वतःच्या मुलाची बायको येसवा...रांड...बाय माजे...गजराचे डोळे पांढरीच्या कांदळ्यासारखे ताठ झाले. स्वप्नांतहि कल्पना करवणार नाहीं असं तिनं ऐकलं होतं. पदर ढळला त्याचीसुद्धां तिला शुद्ध राहिली नाहीं. गजरा चवताळली. सासूबायंच्या अंगावर धांवली. स्वतःवरचा तिचा ताबा सुटला. तिनं सासूबायंच्या मंगळसूत्राला हात घातला. तिचा घो पुढं होण्याआधींच 'व्हयसं काय यमू' म्हणत उठून राघव पुढं झाला आणि त्यानं गजराला मागें खेचली. यमू. तिच्या माहेरच्या नांवानं ती थबकली. पण हिसकाहिसकींत सासूबायंच्या गळ्यांतलं मंगळसूत्र तुटलं. काळे मणी चौफेर घरंगळले. सासूबायंच्या ओरडण्यानं आढं धडकलं आणि सगळ्यांचे घांस तुटले अकलेच्या कुंवतीप्रमाणं प्रत्येकाचं तोंड सुटलं. बघायला आणि ऐकायला अंगणांत वाराहि थांबला.

'व्हयशी अवडार का जालीस ? गावांतल्या बाया पचापचा थुंकतायत नावावर...म्येल्या रागवा, तुला तरी कसा देवान उलतलान नाय ! नरकात ग जाशील नरकात...घो पानी मागतो तं ही बसवी त्या घेडाला पानी पाजतेय...यं जर मला अगोदर ठावं आसतं तं कशाला ग आनली असती तुला घरात ?' सासूबायंचं तोंड मोकाट सुटलं. अगदीं किळसवाणी गोष्ट त्या गजराच्या नांवाला जोडीत होत्या. कांहीं बोलायला राघवनं तोंड उघडलं तर सासूबाय म्हणाल्या, 'तोंड हाय काय बोलायास ? माज्या घराचा इचका केलास म्हारड्या...' आणि मिळाली ती वहाण त्यांनी राघवच्या अंगावर मारली. राघवनं चपळाई केली म्हणून चुकली पण ती गावली जयरामरावांच्या. त्यांनी हरी शिवा गोविंदा केलं. चौथरा बेफाट झाला होता, भिंती बेफाट झाल्या होत्या, वासे बेफाट झाले होते. कुठल्या मुहूर्तावर वाडेशिवणीला आलोसं झालं साऱ्यांना. आकांचं असं लक्षण कधीं कधीं कुणी पाहिलं नव्हतं.

'म्हायेरच्या मानसाशीं बोलूं नको ? कदीं आयशीबापसाची खुशाली काढूं नको ? मं काय सासरोबाशीं गुदूगुदू बोलूं ? फिदीफिदी हसूं ?' कधीं मान वर करूनहि प्रत्युत्तर न करणाऱ्या गजराचं तोंड उघडलं होतं, वादळानीं वास्तूचे चिरे ढांसळावे तसं तिच्या काळजाचं झालं. सारा सारा चांगुलपणा त्या शिव्यांनीं ती पार विसरून गेली. तिच्या कुंकवाचा अपमान झाला होता. तिचे संतापलेले डोळे एकदम भडभडून आले. आयेऽऽ करून तिनं हंबरडा फोडला. पदरांत तोंड झांकून घेतलं...'आयेऽऽ मी येसवा...मी रांड...मी येसऽऽवाऽऽ आ आ आऽऽ'

म्हशासुरासारखी गजरा मागच्या दारीं गेली. राघवला तिच्या हळवेपणाची कल्पना होती. त्याच्या डोळ्यापुढं बाव आडवी तिडवी झाली. तोहि पाठुन धडपडला. सासूबाय कडाडल्या, 'बगा बगा म्येला धावला पाटनं.'

ओटीवरच्या खांबांत आणि गजराच्या घोवांत कांहीं फरक नव्हता.

'यमू ?...गजरा...'


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



पण राघवसुद्धां तिच्या खिजगणतींत राहिला नाहीं. लग्न झाल्यापासून, ती त्याला माहेरचा माणूस म्हणूनच ओळखीत होती.

' यमू...सासू म्हंजे दुसरी आयसच ती. तिचं मन कुनीतरी भारलं असंल...मी जानतो... आका तशा नायत...त्यांच्या पायांवर डोय ठेव...' राघव आर्त होऊन बोलला.

गजरानं त्याच्याकडं पाहिलंहि नाहीं. बोललीहि नाहीं पदरानं तिनं डोळे कोरडे केले. ताठ डोळ्यांनीं ती आंत आली. राघवहि. सासूबायंच्या तोंडाला खीळ नव्हती. राघवनं तोल राखला होता. जयरामराव भ्रमिष्टासारखे झाले होते.

गजरानं सासूबायंना विचारलं, माज्या पदरात घाला काय तं.'

' सारी कातलवाड घालतेय पदरांत...तुज्या-संग राघ्याला सकळच कवाणातनं भायर पडतांना रखमीन पाह्यलान हं खोटं?'

' बाय माजे. आयेचा निरोप सांगायला आले व्हते ते?'

'आसं काय? मं धाकी गुरवनीनं सांगितलान तसं?'

गजरानं कानांवर हात घेतले. तिला तिचं जिणं असह्य झालं. गजराच्या घोवानं आयशी-कडं पाहिलं तेव्हां ती म्हणाली, ' बापयासारा बापया आसुन भितोस कशा? शंभरजनी तुज्याफुडं उब्या करीन.'

' देवा' गजराच्या तोंडून हुंदके आले.

' देवा काय देवा...राख्या म्हन ' सासूबाय गरजल्या. त्यांची विचार करण्याची शक्ति सप्तपाताळांत गुप्त झाली होती.

आणि कुणाकडेहि न बघतां गोफणीच्या खड्यासारखी गजरा बाहेर पडली. दहाहि दिशांतली धिटाई तिच्यांत संचारली होती. तिनं अंगणांतल्या तुळशीला नमस्कार केला.

' माजं ऐक यमू ' पाठून राघव म्हणाला.

' तुमच्या आयबापांची शप्पत हाय माज्या पाटनं याल तं. '

गजरांतुन अकल्पित गजरा उगवली आणि दोघीहि उन्हांत दर्शीआड झाल्या. सासर जरा मुद्दां जागचं हललं नाहीं.

पायाखालीं तापलेली तांबडमाती. माथ्यावर वैशाखाचं रणरणतं ऊन. तिच्या माहेरच्या त्या वाटेनं यापूर्वी ती कित्येकदां सुखासमाधानानं आली गेली होती.

चुटकीसरशी कातळवाडींत गाजावाजा झाला गजराच्या अवंढारपणाचा...बायकं मंगळसूत्र तोडते म्हणजे काय! आणि नरसू-रावाच्या राघवचं सूतगूत! कातळवाडींत सारी फज्जा चाललाय. घोवाला घो म्हणायला तयार नाहीं ती सासूला सासू काय म्हणणार!...दुसरं बोलणंच कातळवाडीला सुचेनासं झालं.

पावलागणीक गजराला ती सकाळ आठवली ...ती सकाळ...भुताच्या शेताकडं राघव जायला निघाला होता. गजरालाच धार पिळावी लागायची. झिटमिटक्यानं ती धार काढायची. आदल्या दिवशीं तो आंजोळी गेला होता. परतायला बरीच रात्र झाली. तिच्या आयशीनं राघवजवळ निरोप दिला होता, ' आगोटचे पन्हे भरायच्या आदीं येवन मला भेटून जा.' धारेचा आवाज ओळखून राघव कवाणांत शिरला आणि त्यानं निरोप सांगितला. तांबू गाय कधीं शेपटी मारायची नाहीं पण त्या दिवशीं अचूक तिच्या शेपटाचा सटका गजराच्या डोळ्यांवर गावला. मग राघवनेंच धार पिळून दिली. दोघं कवणांतुन बाहेर पडली तेव्हांच समोरच्या रखमीनं तिच्या घराचं पुढचं दार उघडलं होतं. त्यांचं रखमीकडं लक्षच नव्हतं. राघव शेताकडं गेला. गजरा घरांत आली... ती सकाळ...त्या सकाळच्या आठवणीनं गज-राला अतिच सतावलं.

' यमूबाया आल्या...यमूबाया आल्या ' गजराची वहिनी तोंडभर म्हणाली.

' कोन ग किस्ने? माजी यमू? ' गजराची आयस आंतातुन बाहेर आली, ' राघवनं निरोप सांगितलान वो पोरीला. किस्ने किस्ने आदी मीठमोहोरी आन. इडापीडा जाव दे शिवेपार. काय बोचकं नाय आनलंस? कोन येतय वाटतं मागनं. ' आयस भराभरा बोलली.

किस्नीनं लगबगीनं मीठमोहरी आणली, तांब्यांतुन पाणी आणलं. आयशीनं मीठमोहरी ओवाळून टाकली. पाणी लेकीच्या पायांवर ओतलं.

गजरा आयशीच्या कुशींत शिरली. कढांना कढ फुटले.

' येकटीचशी?'

' हूं '

' सारी बेस हायत?'

' हूं '

' येवढ्या उनांतनं?'

' हूं '

' सातविनाखालनं वाट येते. येताळाचं रान तं. '

' हं '

' आसं काय? बोलत का नाय?'

आयशीनं लेकीच्या डोळ्यांत डोकावलं. गजराचे हुंदके गळ्यांतुन भसाभसा बाहेर पडले.

' डोळे पूस बाय डोळे पूस. उंद्या वाडा शिवायचाय तं भाऊला घेवंन ते वरडी टाका-यस गेलेयत. '

' आये... आये...दोपारचीच तुज्या साव-लीर्ली आलोय...'

' व्हयशी उखान्यांत काय बोलतेयस? पोरी झपाटली नायस ना सातविनाखालीं? '

किस्नीचं मन चरकलं.

' भानावर हाय मी आये ' म्हणत गजरा विरळशी हसली. आयशीला थोडं हायसं वाटलं. सारी हकीगत गजरानं सांगितली तेव्हां आय-शीचे पंख अधिकच पसरले.

तिनसानचें वाड्याकडून दोघे परतले. त्यांना ही हकीगत समजली. संशयाच्या भूताचा सारा खेळ होता. हें बापसानं ताडलं, त्यानं सांगितलं, ' दिल्याघरींच नांदुन जिण्याचं सोनं करायस हवं. भेटलीस बेस झालं. भाऊला सोबतीस घेवनं बेगूनच आपल्या घरी जा. हा सारा साडेसातीचा फेरा जायल. पण आकस्ताळीपणा करून काय सवसाराला कोलीत लावायचय?'

पण गजरानंहि जाम ऐकलं नाहीं. बाप-साच्या सांगण्याचा तिनं अव्हेर केला. तिनं माहेर सोडलं नाहीं. पोटच्या गोळ्याला काय टाकून देणार थोडंच!

सासरहूनसुद्धां कांहीं पत्र आलं नाहीं कीं निरोपानं विचारपूस झाली नाहीं. तेव्हांपासून राघवहि आजोळी आला नाहीं. त्याच्या आजीनं चांदण्याइतके निरोप पाठवले. पण फुकट. पुढं युद्ध सुरू झालं. वर्तमानपत्रांतून युद्धाच्या भडक बातम्या येऊं लागल्या. गजराचा बापुस पोलीस खात्याचा पेन्शनदार होता. गांवच्या फौजदाकडं ' आठवड्याचा नवाकाळ ' यायचा. त्यांतल्या बातम्या तो ऐकायचा. सैन्यभरती जोरांत सुरू झाली. राघव सैन्यांत गेल्याचं राघवच्या आजीला एक दिवस कळलं. गजराच्या आणि त्याच्या संबंधा-वर कातळवाडीनं नको तसे डोळे रोखले होते. त्याला तें सगळं सहन झालं नाहीं. कुणाला न सांगतांच तो सैन्यांत गेला. राघवच्या आजी-कडून हें गजराला कळलं. बापसाच्या तोंडून ती युद्धाच्या बातम्या ऐकायची. तिचं शरीर काळ्यांनीं तंरारे. राघवच्या आठवणींनं तिचं मन

खळखळलं. राधवच्या आजीची मस्करी तिच्या मनांत अधिकच पिंगायला लागली. माहेरचं घरकाम करतांना स्वतःशींच हंसू लागली.

'व्हयशा येकट्याच हंसतावशा यमूबाया ?' किश्नीनं एकदां विचारलंच.

'मी ?' त्या गावचंच नसल्याचा गजरानं बहाणा केला.

'हूं.'

'हेरीच'

'नाय नाय...काय तरी...सांगा ना'

'येडी माजी वैनी. माज्याकडनंच अैकायचय ? आणि गजरानं नजरेचे त्रिकोण चौकोन केले. किश्नी लाजली.

'अगे वैनी...तुजी यमूबाया आता यमूआत्या व्हायाचीय.'

अधीकच लाजून किश्नी गजरा पुढून सटकली.

प्रत्येकवेळीं गजरा असं शिताफीनं मनांतलं लपवायची. तिला आयसपण म्हणाली, 'पोरी यमू आतसं तुज्या मनचं काम गवसतच नाय.' गजरा बोलली, 'तुजं आपलं कायतरीच. मी बोलतोय...हासतोय...'

दिवसरात्रीच्या झिम्म्याला अंतर पडलं नाहीं आणि गजराच्या माहेरी किश्नीवैनीचा पाळणा हलला. पऱ्हयाच्या रेवेंत पाणी मुरावं तसं गजराच्या हुंदक्याचं झालं. तिच्या ऐकाकी दुःखाला आणखी पालवी फुटली.

एक दिवस राघवची आजी सांगत आली कीं गजराचा धोपण सैन्यांत गेला म्हणून. तरी गजराला कांहीं कांहीं वाटलं नाहीं. तिच्या नित्याच्या व्यवहारांत कसलाहि चुकचुकलेपणा आला नाहीं. दिवसेंदिवस राघवच्या आठवणीनं तिच्या मनांत पाळंमुळं पसरली होती. त्याच्या आठवणीनं मात्र तिच्या मनांत युद्धाच्या बातम्यांची भुतावळ उठे आणि ती कष्टी होअी. तिच्या नित्याच्या व्यवहारांत चुकचुकलेपणा येअी. पोर कष्टी म्हणून आयस कष्टी. तरी गजराच्या मनांत आयशीचा शिरकाव झाला नाहीं.

किश्नी भाकऱ्या भाजीत होती. आयशी संग गजरा मागच्या दारीं पावठणीवर बसली होती. चांदणं उतूं जात होतं. परड्यांतल्या कलमाशीं वारा कुजबुजत होता. गजराच्या मांडीवर भाचा झोपला होता. वापुस ओटीवरच्या माच्यावर आडवा झाला होता. पुढच्या अंगणांत भाऊ दांवं वळत होता.

'येक अैकशील ?' आयशीनं विचारलं.

'येक कां...हजार–' भाच्याच्या जायवळावरून हात फिरवीत गजरा म्हणाली.

'हजार नको...येकच...तुज्या मनूचं चुकलं असंल...'

'मल्नीचा बैल म्हनतात फिरून फिरून तिवड्यावरच येतो.'

'पन ऐकून तं घे...तुजं मालकीचं घर हाय तं...सासुरवासनीनं मालकीचं घर कदी सोडूं नये.'

'आता माजं ऐकशील ?'

'कां नाय ?'

'तूं पन किश्नीवैनीची सासू हायस. मं तूं नाय रांड येसवा म्हनत तिला ? पोर पोटी आल्याबीन पोरीचं दुक कलत नाय आये.'

'तुजी सासूबाय चांगली हाय...पन कुनाची गिरंदशा कुनास ठावी...तिची गैरसमजूत झालेय येवडं खरं...'

'सून जिती हाय का मेली का कुनाचा हात धरून गेली याचा पूसतपास तरी करायचा.'

'पन पोरी.'

'तूं काय सांगूं नको. मी जड होत आसंन तं आत्ता नायशी व्हतो हितनं.'

आयशीनं बोलणं आवरतं घेतलं. पुन्हां कधीं असलं बोलणं काढलं नाहीं.

त्यावर वर्ष लोटलं. युद्धाचा वणवा भयानक पसरला.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गजरा भाच्याला न्हाऊमाखू घालीत होती तेव्हां राघवची म्हातारी आजी काठी टेकत हांव घालीतच आली. डोळ्यांना तळव्याचं छप्पर करीत तिनं विचारलं, 'कोन ग ?'

'मी ना वो आजीबाय. बावाला न्हाव घालतोय.'

'कोन किस्ने ?'

'किस्नी नाय...मी यमू यमू.'

'तूं व्हय...देव आता कशा जगवतोय मला कुनास ठावा. बोलव म्हनतो तं ऐकतच नाय.'

'अवो आजीबाय तं काय मानसाच्या हातचं हाय ? जेवडा भोग आसंल तेवडा भोगायचा आन हितनं चालायस लागायचं.'

'अज्जी आजीबायसारकं बोल्तेयस. आये कुटाय ?'

'हितंच व्हती. आये ?'

'काय गे ?' बाहेर येत गजराच्या आयशीनं विचारलं.

'यमूच्या आयशी ?'

'काय वो ?'

'नको नको तं कानांवर येतं येकेक.'

'काय ?'

'यमूच्या घोवाने दुसरं लग्न केलान म्हनतात.'

तें ऐकतांच यमूची आयस भोंवळली. तिथंच मटकन बसली. झोपलेल्या सावजावर वार करावा तसं यमूचं झालं. गडबड ऐकून भाऊ आला, बापूस आला, किश्नी आली. जांवयावर फिर्याद करायची भाषा बापसानं काढली. गजराला तें रुचलं नाहीं. ती शांतपणं म्हणाली, 'माज्या नशिबांत सटवीनं लिवलं व्हतं तं घडलं. आसलं काय इपरीत मनांत आनूं नका. माजं दुक मी भोगंन.' तिला तिचा मुहूर्त आठवला. तिच्या मनांत ताशांचा कडकडाट झाला... तिच्या मनाचाच तिला थांग लागेनासा झाला. कुणी राक्षसानं तिच्या मुंडवळ्या तुडवल्या... तुडवलेल्या मुंडावळ्या उचलून राघव क्षितिजापार पळाला...तिनं भाच्याचे पाण्यावर पापे घेतले...गजरा श्वासाश्वासांत घालमेलली... स्वप्नजागृतीचा तिच्या मनांत काला झाला.

फणसाच्या पानासारखे दिवस गळत होते. किश्नीवैनीला मदत करतां करतां एका काळ्या शनिवारीं पोस्टांतून कार्ड आलं. चारच ओळी त्यावर खरडलेल्या होत्या. गजराच्या सासऱ्यानं कळवलं होतं कीं तिच्या घोवाला युद्धांत गोळी लागली होती. सासरहून आलेलं कार्ड. एकदांच आलं. तिचं कुंकू पुसायला. काळी पोत तोडायला. गजरानं आयशीची कूस भिजवली. तिच्या दुःखानं माहेराला तडा गेला.

वाऱ्याला आलेल्या जिण्यानं गजरा कमालीची मुकी झाली. अगदीं कारणापुरतंच बोलूं लागली. चारचौघांतून उठून कोपऱ्यांत एकाकी बसूं लागली. युद्धाच्या बातम्यांची मनाशीं पारायणं करूं लागली.

युद्ध संपलं. आजचे दिवस आले. कातळवाडच्या नरसूरावांचा राघव मर्दुमकीनं सैन्यांत सुभेदाराच्या हुद्यापर्यंत चढला. पण आजोळी तो एकदांहि फिरकला नाहीं. लग्नहि केलेलं नाहीं. म्हाताऱ्या पोरक्या आजीला त्याला मरण्यापूर्वी बघावसं वाटलं म्हणून त्याची रजा साधुन ती रखडत रखडत कातळवाडीला गेली. गजराचं सासर अनुतापानं पांढरं फिकट झालंय. गजराचा बापुस म्हातारा झालाय. तिची आयस खंगलीयें. भाऊला तीन मुलं झालेयत. गजराचे पुढचे केस पिकलेयत. गजरा पंढरीची वारकरीण झालेय. कपाळाला बुका लावलेली गजरा भाऊच्या संसाराला हंसवतेय... ●●●

*दीपावलीच्या जुलै १९६३ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या आदिवासींच्या जीवनाचा परिचय करून देणाऱ्या लेखाचा हा वाचनीय असा पुढील भाग—*

# मैकल पर्वतराजींतील सौंदर्यवेडी प्रियंवदा



—यशवन्त शास्त्री

**बैगा** पुरुष हा स्त्रीपेक्षां दिसावयास सुंदर असतो. बैगा स्त्रिया सुंदर असल्याचें मी मंडल्यास जाण्यापूर्वी फार ऐकलें होतें; परंतु अनुभव उलटा आला. मैकल पर्वतराजींत राहणाऱ्या बैगा लोकांत मात्र एक प्रकारचा गोडवा निश्चित आहे. गोंड जमातींतील लोकांपेक्षां मात्र हे लोक अधिक देखणे आहेत. अर्थात् येथें ज्या गोंडांचा उल्लेख करीत आहे, ते गोंड मंडला जिल्ह्यांतीलच होत. बस्तरमधील गोंड जमात मात्र कमालीची देखणी आहे. त्या जमातींतील पुरुष आणि स्त्रियाहि देखण्या आहेत. बैगा पुरुष गोंड पुरुषाप्रमाणें धिप्पाड नसतो. तो सडपातळ आणि उंच बांध्याचा असतो. ते सर्वच रंगानें काळे आहेत. बैगा पुरुष डोक्यावर केंस वाढवतो व स्त्रियांप्रमाणें त्यांचा बुचडा ( आंबाडा ) बांधतो. लांबून जर एकादा तरुण बैगा येत असेल, तर तो पुरुष आहे कीं स्त्री आहे, हें ओळखणें कठीण होऊन बसते 'भूमिया' गोत्राचे बैगा मात्र डोक्याचे केंस कापतात. पुरुषाच्या शरीराप्रमाणेंच त्यांचे नाक-डोळेहि घरघरीत असतात. बैगा स्त्री कांहींशीं ओबडधोबड असते असें म्हटल्यास हरकत होणार नाहीं. त्या अंगानें कांहीशा स्थूल, ठेंगण्या आणि जाड मांड्या असलेल्या आहेत. त्यांचा तोंडवळा हटकून गोलाकार आणि फुगीर असतो. डोळे बारीक असतात; पण त्या बारीक डोळ्यांतहि इराणी घोड्याच्या डोळ्यांत दिसणारी तल्लख असते. बैगा स्त्री तुम्हांला हटकून हंसरी आणि आनंदीच दिसेल. कांहीं बैगा मुली मात्र मला सुंदर दिसल्या. चौकशी केली तेव्हां, गोंड आणि बैगा यांच्या वर्णसंस्कारानें झालेली प्रजा व विशेषतः मुली विशेष सुंदर असल्याचें समजलें. अशा सौंदर्याचें प्रमाण अर्थातच विरळ आहे.

बैगा जमातीचें एक मोठें अव्यक्त वैगुण्य मनात सलतें. बैगा लोक हे आपली मूळ भाषा विसरून गेले आहेत. हेंच तें वैगुण्य! स्वतःची भाषा विसरलेले हे बैगा छत्तिसगडी भाषा बोलतात. आपल्या पूर्वजांची 'बैगा बोली' होती, हें सुद्धां हे लोक विसरून गेले आहेत! बैगा बोली कोणत्या प्रकारची आहे, हें मला निश्चित सांगता येणार नाहीं. ओरिसामधील बैगा मात्र आपल्या स्वतंत्र बोलींत बोलतात आणि त्या बोलींतील कांहीं शब्दप्रयोग अमरावती मेळघाटच्या जंगलांत रहाणाऱ्या कोरकू आदिवासींच्या बोलींत आले असल्याचें समजलें. हे बैगा स्वतःला रावणाचे वंशज समजतात. रावणाची बोली कोणती होती, हें संशोधकांनीं ठरवायचें; पण रावणाच्या ह्या वंशजांनीं मात्र छत्तिसगडी बोलीचाच आश्रय केला आहे. बहुतेक सर्व बैगा स्त्री-पुरुषांना हिंदी भाषा समजूं शकते व प्रसंगोपात ते मोडकीतोडकी हिंदी बोलतात. मेळघाटमधील कोरकू हें सुद्धां रावणाचेच आपण वंशज आहोंत असें मानतात. बैगा आणि कोरकू हे दोघहि स्वतःला रावणाचेच वंशज समजत असल्यामुळें, कोरकू लोकांत बैगी भाषेचे शब्द घुसले असावेत, असा निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं! मंडला जिल्ह्यांत मात्र हिंदी भाषाच बोलली जाते. मूळ हिंदींत व मंडल्याच्या हिंदींत फरक मात्र आहे व ह्या भाषेला तेथें 'गोंडवनी' किंवा 'मंडला बोली' अशा नांवानें संबोधलें जातें. ही भाषा विंध्य प्रदेशांतील 'रिवाई' आणि 'बघेली' बोलींशी बरीच जुळते. मंडल्याची मूळ भाषा गोंडी आहे. बैगा लोक वृत्तीनें जसे नामानिराळे आहेत, तसेच भाषेच्या बाबतींतहि नामानिराळेच राहिले आहेत. शतकानुशतकें मंडल्यांत राहूनहि त्यांनीं 'मंडला बोलीचा' अंगिकार केलेला नाहीं! मंडला जिल्ह्याला मराठी भाषेचा संपर्क लागलेला नाहीं, असें मुळींच नाहीं. मागील शिरगणतींत मराठी भाषिकांची मंडला जिल्ह्यांतील संख्या ६२५ असल्याचें समजतें.

बैगा लोक आपल्या गांवांचीं नांवें आसपासच्या वृक्षांवरून अथवा डोंगरावरूनच देतात. उदाहरणार्थ आमगांव, पिपरीया, कोसुमुंडी, तेंदुखेडा, पाखरी, उमरखाडा, राई, बारखेडे हीं सर्व नांवें आंबा, पिंपळ, उंबर, कुसुंबा, मोहरी, बोरी वगैरेंच्या झाडांवरून दिली गेलीं आहेत. त्याचप्रमाणें डोंगरांनां अनुलक्षून चिराइ डोंगरी, भीम डोंगरी, कबाड, गोथी अशीहि नांवें आढळतात.

'गोथी' म्हणजे डोंगर.

बाहेरच्या जगापासून लांब पळण्याची वृत्ति बैगा लोकांत मूळ धरून असली, तरी आलेल्या पाहुण्यांचें आदरातिथ्य ते अत्यंत अगत्यानें करतात; हें मात्र खरें. एकादा सुधारलेला इसम गांवांत आला आणि त्याला तेथें रहावयाचें असेल, तर हा बैगा इसम त्याला आपल्या घराची ओसरी रिकामी करून देईल. स्वतः जमिनीवर झोंपेल व पाहुण्यासाठीं आपली एकुलती एक चटई देण्याचीहि तो तयारी

दाखवील. तो स्वतः चांगला तांदुळ किंवा तूप खाणार नाहीं पण पाहुण्यासाठीं तो चांगला तांदूळ आणून पुढें ठेवील. स्वतः नदीवर जाऊन मासे पकडून आणील. घरांतलं तूप त्याच्या हवाली करील आणि पाहुण्यानें गोडधोड खावें म्हणून थोडासा राखून ठेवलेला मधहि समोर ठेवील आणि ह्या सर्व आदरातिथ्यांबद्दल त्याला मोबदल्याची तिळमात्र अपेक्षा नसतें. इतकेंच नव्हे, तर कोणी मोब-दला देऊं केला, तर तो त्याला अपमान वाटतो, हें विशेष होय!

बैगा जमातींतील लोक वर्षांतून एकदांच स्नान करतात असा प्रवाद सर्वत्र रूढ आहे. हा प्रवाद खोटा आहे, असें सांगून टाकावेसें वाटतें. अनेक ठिकाणीं मी ह्या बैगा लोकांना व स्त्रियांनाहि नदीवर जाऊन स्नान करतांना पाहिलं आहे. हा लोकप्रवाद खरा आहे काय, अशी मी कांहीं बैगा लोकांनाच पृच्छा केली तेव्हां त्या सर्वांनीं 'दररोज स्नान केल्याशिवाय आमचें भागत नाहीं,' असेंच सांगितलें. लोकां-मध्यें आपल्यासंबंधीं हा प्रवाद रूढ आहे. हें ऐकून मात्र त्यापैकीं सर्वां-नाच अत्यंत वाईट वाटल्याचें दिसलें.

ह्या लोकांत दागिन्यांच निरनिराळे प्रकार आहेत. कांहीं प्रकारचे दागिने इतर आदिवासी जमातींतील दागिन्यांशीं जुळतात. त्यांचीं नांवें मात्र भिन्न भिन्न आहेत. मुंद्री (अंगठी), बाला (वाळी), साकरी (सांखळी), पैंजन (पैंजण), टाकां (जोडवें), मांगचिटनी (कपाळा-वरील बिंदी), फुंडारा किंवा झला (पानांचे रीबन), धार, छटा, दारकना (बाजुबंद), खारा ऊत (पावसाळ्यांत वापरण्यासाठीं लाकडी पैंजण) वगैरे प्रमुख दागिने होत. लंगोटी व्यतिरिक्त बैगा पुरुषांची आभूषणें म्हणजे मण्यांच्या व गुंजेच्या माळा होत. नृत्य प्रसंगाचेवेळीं ते मोरपिसांची 'कलंगी' मात्र वापरतात व स्त्रिया नाना तऱ्हेचे गजरे करून फुलें घालतात. पिवळ्या रंगाचीं 'आमलक्षा'चीं फुलें त्यांना विशेष प्रिय असतात. नृत्याच्यावेळीं दारूचे दोन घोट पोटांत गेले कीं ह्या कजरी बनांतील प्रियवंदा आमलक्षाच्या फुलासारख्याच गोड व गोंडस भासूं लागतात. ही प्रियवंदा सदैव वेडावलेलीच असते! स्त्रियांनीं नाकांत कोणताहि दागिना घालणें बैगा जमातींत त्याज्य मानलें जातें. इतर आदिवासी जमातींत मात्र नाकांतला दागिना (फुली किंवा बेसर) हें सौभाग्याचें आणि सौंदर्याचें लक्षण मानण्यांत येतें.

गोंड जमातीप्रमाणेंच बैगा जमातींतहि गोत्राची पद्धत आहे. हिंदुपद्धतीप्रमाणेंच बैगा लोकांतहि एका गोत्राच्या मुला-मुलींचीं लग्नें होत नाहींत. त्याचप्रमाणें एकाचें जें दैवत असेल, तेंच दुसऱ्याचें असेल तर त्यांच्यातहि विवाह होणार नाहींत. कांहीं ठिकाणीं स्वयंवराची पद्धत ह्या जमातींत आहे. मुलगी आपला नवरा अशावेळीं पसंत करते. परंतु ही पद्धत थोड्या प्रमाणांतच अंमलांत येते. बव्हंशीं मुलीचे आई-बापच मुलाच्या आई-बापांकडे 'मागणी' करण्यास जातात. कांहीं लग्नें 'लमजाना' पद्धतीनेंहि होतात. ही पद्धत बालाघाट जिल्ह्यांतील गोंडांत व मेळघाटमधील कोरकू लोकांत विशेष प्रचलित आहे. लग्न जमलें कीं, वरपक्षाकडून वधुपक्षाला कांहीं रकम द्यावी लागते. ही रकम कमीत कमी २ रु. आणि जास्तीत जास्त पंचवीस रुपये असते. ही रकम देण्याची ऐपत असलेला नवरदेव कांहीं दिवस मुलीकडे अक्षरशः चाकरी करतो व सुमारें तीन वर्षांनीं नवरी आपल्या पदरांत पाडून घेतो. ह्या पद्धतीलाच 'लमजाना' म्हणतात. बायकोसाठीं चाकरी करणारे कांहीं 'लमजाने' मी पाहिले त्यापैकीं कांहींचीं लग्नें चाकरीच्या काळांतच उरकली होती व त्यांना मुलंबाळेंहि झालीं होती. इतक्या-वरहि लग्नाची रकम फिटली नाहीं म्हणून तो चाकरीच करीत होता. ह्या काळांत जर लमजाना विवाहबद्ध झाला असेल, तर त्याला बिचा-ऱ्याला आपल्या बायकोचीच चाकरी करण्यांत दिवस घालवावे लागतात!

ह्या लोकांत बालविवाह होतात. कित्येकदां तर मुला-मुलीचा जन्म होऊन कांहीं महिने लोटले नाहींत, तोंच त्यांचा एक तर वाङ्-निश्चय झालेला असतो अथवा लग्नसुद्धां लागलेलें असतें. वाङ्निश्च-याचेवेळीं मुलाच्या बापाला मुलीच्या घरीं जाऊन मेजवानी द्यावी लागते. होऊं घातलेलें लग्न सुखाचें होणार किंवा नाहीं, हें पडताळून पहाण्याचीहि त्यांची एक पद्धत आहे. गोलसर पण उथळ असें एक भांडें पाण्यानें भरावयाचें व त्यांत दोन तांदूळ टाकावयाचे. तांदूळ पाण्यांत बुडून तळाशी एकमेकाला जुळून बसले कीं, लग्न सुखाचें होणार असें ते धरून चालतात. अर्थात् अशा भांड्यांत बहुधा तळाशी तांदूळ जुळतातच हें सांगावयास नको!

विवाहसमारंभाचा थाट कांहींसा जंगलीच असतो. अशा समा-रंभांत हत्तीला विशेष महत्त्व असते. फार पूर्वींच्या काळांत कजरी बनांत हत्तींचें बरेंच वास्तव्य होतें व कित्येक बैगा हत्ती बाळगीत असत असें म्हणतात. आज मात्र ह्या बनांत हत्ती नाहींत आणि हत्ती पोसण्याची ताकदहि आजच्या बैगा लोकांत नाहीं. पूर्वीची हत्तीची रूढी मात्र लग्न-समारंभांत निराळ्या रीतीनें पार पाडली जाते. एका खाटेवर कांबळे आंथरतात व खाटेच्या एका बाजूला मधोमध कापडाची सोंड करून बांधतात. हा लग्नांतला हत्ती! हत्ती कापडाचा किंवा खाटेचा असला तरी चालेल; पण हत्ती हा हवाच! लग्नाची वरात मुलीच्या मांडवाकडे जात असतांना हा हत्ती पुढें येईल आणि त्या मिरवणुकीवर 'हमला' करील. हत्तीसोबत मुलीकडची वरात असते. अर्थात् वधुपक्ष वरपक्षावर हमला करतो हाच अभिप्रेत अर्थ आहे. हा 'हमला' झाला कीं, वरपक्षाकडून वधुपक्षाच्या 'हत्तीला' एक रुपया द्यावा लागतो. हा रुपया दिला कीं, दोनहि व्याही एकमेकाला वाटेंतच मिठ्या मारतात व दोनहि वराती नंतर लग्नमंडपांत जाऊन पोंचतात. मंडपांत साल वृक्षाचें एक बाळकें झाड रोंवलेलें असतें. त्याजवळ येऊन वधुवर एकमेकांवर तांदुळाच्या अक्षता फेंकतात व वृक्षाभोंवतो सात प्रदक्षिणा घालतात. आटोपला लग्न समारंभ. अशा तऱ्हेनें लग्न समारंभ आटोपल्यानंतर त्याच दिवशीं रात्रीं मधुचंद्रासाठीं म्हणून, वधु-वरांनीं एकटेंच जंगलांत जाऊन राहण्याची पद्धत होती, परंतु आज ह्या पद्धतीचा कोणीहि अंगिकार करीत नाहींत.

एका माणसाला वाटेल तितकीं लग्नें करण्याचा अधिकार आहे. धनवाई येथें माझ्या मुक्कामांत जेठू नामक एका वयस्क बैग्याशी माझी

## महत्त्वाची सूचना—

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**






बरीच दोस्ती झाली होती. जेथूचें वय आज ६२ वर्षांचें आहे. त्याचें पहिलें लग्न तो आठ महिन्यांचा असतांना झालें. त्यानंतर आजतागायत त्याचीं एकंदर ३९ लग्नें झालीं. शेवटचें म्हणजे ३९ वें लग्न त्याच्या वयाच्या ५६ व्या वर्षी झालें. जेथूच्या ११ बायका पळून गेल्या आहेत आणि ३ बायकांचा अंत झाला आहे. आज बरोबर २५ लग्नाच्या बायका जेथूला त्याच्या म्हातारपणी साथ देत आहेत ! ह्या २५ बायकां-पैकीं कांहीं अगदीं तरूण आहेत आणि त्यापैकीं कांहींची पळून जाण्याची शक्यता स्वतः जेथूनेंच माझ्याजवळ बोलून दाखविली ! जेथूचा हा स्पष्टवक्तेपणा मला आश्चर्यचकित करणारा वाटला असला, तरी जेथूला मात्र त्याचें कांहींच वाटलें नाहीं. लग्न करणें किंवा लग्नाची बायको पळून जाणें, ही अगदीं हातच्या मळासारखीच गोष्ट ह्या लोकांना वाटते !

पळून गेलेली बायको हां हां म्हणता दुसऱ्याशीं संसार थाटते. थाटलेला संसार केव्हां मोडेल याची मात्र नवरोबाला कधींच शाश्वती नसते !–आणि संसार मोडला तरी त्याचें त्याला कांहीं वाटत नाहीं. कारण क्षुल्लक कारणासाठीं एका झोपडीचें खास गांव निर्माण करणाऱ्या बैग्याला दुसरा संसारहि तितक्याच सहज-तेनें उभा करणें केव्हांहि अशक्य नसतें. नवरा-बायकोला काडीमोड तर हां हां म्हणता मिळतो. गांवां-तील पंचांसमोर उभें रहावयाचें आणि सोडणार असलेल्या नव-ऱ्याचें नांव घेऊन बायकोनें एक गवताची काडी मोडायची ! ह्या बैगा समाजांत लग्नाला खरो-खरीच तृणाचीच किंमत आहे ! स्त्रियांना काडीची किंमत नाहीं, पुरुष स्त्रीचें वाटेल तें करूं शकतो. एखाद्या पाळीव जनावरांपेक्षां तिला दुसरें महत्वाचें स्थान नाहीं.

सुशिक्षित महिला आज-काल स्त्री–स्वातंत्र्याचे नारे लावीत आहेत. शहरांत राहून सभा–संमेलनांत हे नारे लावण्यांत काय अर्थ ? सुशिक्षित महिलांना स्त्रियांचें खरें स्वातंत्र्य हवें असेल, तर त्यांनीं प्रथम जनावरांप्रमाणें वागविल्या जाणाऱ्या ह्या बैगा स्त्रियांची स्थिति सुधारली पाहिजे. मागें मेळघाट तालुक्यांतील कोरकू आदिवासींसंबंधीं लिहि-तांना महिला परिषदेला मी हीच सूचना केली होती. महिलांचा एक फार मोठा वर्ग आज अशा रीतीनें जंगलांत निव्वळ गुरा–ढोरांसारखा जगत आहे. महिला परिषदेचें कार्य आतां केवळ शहरांपुरतें मर्यादित राहिलें नाहीं. बैगा जमातींतील स्त्रियांसंबंधीं मी जें पाहिलें तें भयंकर आहे. महिला परिषदेच्या सदस्यांनी छोटे छोटे गट करून, ह्या लोकांत आतां वावरलें पाहिजे.

वनवासी सेवा मंडळाचे लोक ह्या जंगली जमातीच्या उत्थानाचें कार्य करीत आहेत. पण त्यांच्या कार्यासंबंधीं आदिवासी लोकांत तरी



प्रकाश योजना !

फारसा आदर दिसत नाहीं. कांहीं बोटांवर मोजतां येण्याजोगे कार्यकर्ते अपवाद म्हणून वगळले, तर बाकी वनवासी सेवा मंडळ ही पोट-भरू लोकांचीच संस्था झाली आहे, अशी त्यांची भावना आहे. परंतु होणारा खर्च व असलेला पसारा ह्या मानानें कार्य मात्र भोपळ्या-एवढ्या पूज्यासारखें आहे ! केवळ मोटारींतून फेरफटका मारून किंवा ह्या लोकांना सिनेमा अथवा नाटकें दाखवून त्यांचें उत्थान होणार नाहीं. परदेशी मिशनऱ्यांनीं ज्या हिरीरीनें व आपुलकीनें ह्या विभागांत प्रवेश केला, ती आपुलकी व हिरीरी वनवासी सेवा मंडळ आणि आदिवासी कल्याण विभाग यांत अतिशय अल्प दिसते ! आदिवासी कल्याण विभाग आणि वनवासी सेवा मंडळ या दोनहि संस्थांना ह्या उत्थानासाठीं दरवर्षी लक्षावधी रुपये दिले जात आहेत; परंतु पैशाच्या मानानें कार्य कांहींच नाहीं. आदिवासी कल्याण विभागांतील कर्मचाऱ्यांसाठींच ह्यांतला बहुतेक पैसा खर्च होतो व बिचाऱ्या आदिवासींना त्याचा फायदा होत नाहीं, अशी कुरकुर ऐकू येते.

ह्या बैगा लोकांच्या रूढी आणि संस्कृति उच्च दर्जाच्या आहेत. त्यांची जोपासना झाली पाहिजे. शहरी विभागांत जी सुधारणा किंवा प्रगति नांवाची वस्तू समजली जाते, ती ह्या लोकां-वर लादली जाऊं नये. सुधार घड-वून आणणाऱ्या ज्या संस्था आज ह्या विभागांत ‘ कार्य ’ करीत आहेत, त्यांचें तें ‘ कार्य ’ व त्या कार्याची पद्धत अनेकांनी पाहिली आहे. अनुसूचित जातीच्या क्षेत्रांत जी कार्यपद्धति आवश्यक असते, तशा कार्यपद्धतीचा येथें अंगिकार होत नाहीं, हेंहि स्पष्ट सांगून टाकावेसें वाटतें. मध्य प्रदेश सरकारचा आणि केंद्र सरकार-चाहि पैसा सकारण खर्च होण्या-ऐवजीं तो अकारणी खर्ची पडत आहे. अशा संस्थांकडून बाहेरचे लोक कार्यकर्ते म्हणून आणले जातात, हे गैर आहे. बैगा किंवा गोंड जमातींतीलच लोकांना कार्यकर्त्यांसाठीं तयार करण्याचा उपक्रम ह्या संस्था कां अंगिकारित नाहींत ? अनुसूचित जातींच्या उत्थानासाठीं कांहीं कोटी रुपयांची रक्कम केंद्र सरकारनें नुकतीच मंजूर केल्याचें सर्वश्रुत आहे. ह्या रकमेपैकीं मध्य-प्रदेशासाठीची रक्कम–वनवासी सेवा मंडळाच्या छिंदवाडा येथील प्रमुख कचेरी मार्फत वाटप केली जात आहे. ह्या पैशाचा योग्य विनियोग होत नसल्याच्या कांहीं तक्रारी आहेत. पैसा ज्या कार्यासाठीं दिला गेला आहे, त्या कार्यासाठींच तो खर्च होतो किंवा नाहीं व त्याचा फायदा बैगा-गोंड व इतर आदिवासींना मिळतो किंवा नाहीं याकडे वनवासी सेवामंडळानें डोळ्यांत तेल घालून पाहिलें पाहिजे. कार्यकर्त्यांनीं प्रत्यक्ष आदिवासी लोकांत मिसळून कार्य केलें पाहिजे. आजचें बव्हंशी ‘ कार्य ’ केवळ कागदोपत्रींच होत असतें, अशा कांहीं तक्रारीहि सरकारकडे केल्या गेल्याचें समजतें. •••

अनुक्रमणिका



*आणि...एके दिवशीं ती मुंबईला निघून आली. तिचं मन रडूं लागलं...स्फुंदू लागलं...! मुक्या मनोव्यथा व्यक्त करणारी भावपूर्ण कथा——*

# पत्र लिहायचंय मला

—प्रेमानन्द वळवईकर

—'लग्न झालंय माझं ?'

हो• खरंच, माझं लग्न झालं ! एकवेळ माझं मलाच आश्चर्य वाटतं. मन शंकाकुल होतं. मनांत विचार येतो. खरंच कां माझं लग्न झालं आहे ? आणि मग आठ दिवसाअगोदरचा प्रसंग मला आठवतो. पांच–सहा माणसांबरोबर मी वांद्र्याच्या कोर्टांत गेले होते. दीड महिन्यापूर्वीं मला पाहायला आलेला मुलगाहि तिथं हजर होता. त्याच्याबरोबर त्याचे कांहीं नातेवाईक होते. कायदेविषयक कांहीं कागदपत्र आमच्या-कडून भरवून घेतले होते. त्यांतील बंधनाचा उच्चार-तेथील संबंधित अधिकाऱ्यानं आमच्या-कडून करवून घेतला होता. त्या क्षणापासून पतिपत्नीच्या कर्तव्यपालनांत आम्ही बांधलीं गेलों होतों. वैवाहिक संबंधाचं प्रतीक म्हणून मंगळसूत्र माझ्या गळ्यांत बांधलं होतं. अवघ्या पंधरा मिनिटांच्या अवधींत लग्नाचा सोहळा आटोपला होता ! विवाह नोंदणीचं ऑफीस सोडून आम्ही सर्वजण मुख्य रस्त्यावर आलों होतो. प्रत्येकजण आपापल्या घरीं जाणार होता. आणि मी...?

हो...मीसुद्धां जाणार होते. परंतु माझं घर एक नवीन घर होतं. नवीन नाहींतर काय ? त्यावेळीं तरी तें नवीनच होतं. ज्या रस्त्यानं मी आलें, त्या रस्त्याला एक उपरस्ता सांधला होता. आणि त्या नव्या रस्त्यानं मला नवीन घराप्रत जायचं होतं. माझ्या नवीन आयुष्याचा श्रीगणेशा तिथंच होणार होता. नवीन अनु-भवाचं विश्व मला उभारायचं होतं. मुलीच्या आयुष्यांत होणाऱ्या ह्या स्थित्यंतराचा तिला कोण आनंद होत असतो बरं !

बाबा, हीच गोष्ट मला तुमच्या कानावर घालायची आहे. पत्र लिहायचं आहे मला. खूप प्रयत्न करते परंतु हा विचार केवळ विचारच राहतो. तो आचारांत येऊं इच्छित नाहीं. असं कां व्हावं ? एखादी आनंदकारक घटना आपल्या माणसापाशीं व्यक्त करण्यांत एवढें कष्ट कां व्हावेत ? मनाची इतकी दोलाय-मान अवस्था का व्हावी ? आल्हादानं उफा-ळून येणाऱ्या उर्मी एकाएकी का थंडावल्या जाव्यात ?

बाबा, तुमचीच कृति त्याला कारणीभूत नाहीं का ? खऱ्या अर्थानं माणूस केवळ अन्नवस्त्रावर जगूं शकत नाहीं. धनसंचयानं जीवनांतील मूल-भूत मूल्यांचं महत्व कळत नाहीं. जीवनसाफल्या-साठीं त्याला इतर कांहीं गोष्टींची जोड हवी असतें. एकवेळ त्यांच्याशिवाय तो जगूंही शकेल. परंतु अशा जगण्यांत उथळपणा असेल. नैराश्यपूर्ण वृत्तीनं तो भावी कालाचं स्वागत करील. कारण त्याच्या आयुष्यांत कशाची तरी उणीव असते. ही उणीव त्याला जीवनसौख्यांपासून पराङ्मुख करीत असते. त्यासाठीं त्याला हवं असतं...प्रेम !...माया !! वात्सल्य !!! नेमकी हीच गोष्ट आमच्या वाट्याला आली नाहीं. दैवानं आमचं हें सुख अगदीं लहानपणींच हिरावून घेतलं.

आम्ही दोघंच भावंडं. मी व माझ्याहून दोन वर्षांनीं थोरला माझा भाऊ सुरेश. मी दीड वर्षांची असतांना माझी आई वारली. अर्थात मी तिला पाहिली असली पाहिजे परंतु कितीही प्रयत्न करून देखील मला तिचा चेहरा आठ-

वत नाहीं. घरांत ठिकठिकाणीं टांगलेले वाड-वडिलांचे आणि देवतांचे बरेच फोटो आहेत. परंतु त्यांत माझ्या आईचा एखादाही फोटो नाहीं. प्रसंगीं तिची प्रतिमा मी डोळे भरून पाहिली असती. स्वतःचं सांत्वन केलं असतं. कधींकधीं शेजाऱ्यापाजाऱ्यांनाही तिच्या आठवणीनं गहिवर येतं. डोळे अश्रूंनीं डबडबले जातात. ते तिच्या चांगुलपणाची वाखाणणी करतात. औदार्याची अन् व्यावहारिक सूज्ञपणाची स्तुति करतात आणि मग मनोमन खात्री पटते. खरोखरच माझी आई चांगली असली पाहिजे. गुणावंती असली पाहिजे. माझ्या मावशी-सारखंच तिचं रूप होतं म्हणे. किंचित वरचढ. बाबा तुम्हीं आम्हांस दिलं तें तुमचं रूपडं. आईनं दिला आपला विनयपूर्ण स्वभाव! तिनं आपलं रूपहि आम्हास जोडीला दिलं असतं तर? परंतु गुणी माणसांचा अल्प-वयांत बळी घेणाऱ्या निर्दय काळाला तें आवडलं नसतं. नाहींतर दुर्दैवी म्हणून आम्हांस कसं जगतां आलं असतं? विसंगत ठरलं असतं तें...!

पुढं सहा महिन्यांनीं तुम्हीं दुसरं लग्न केलं. लोकांना वाटलं, लहान मुलांकडं पाहून तुम्हीं दुसऱ्या लग्नाचा निर्णय घेतला असावा. सावत्र आईच्या वात्सल्याचं छत्र आम्हांस देण्यासाठीं तुम्ही तळमळत होता. परंतु अल्पावधींतच लोकांचा कयास खोटा ठरला. तुमचा नवा संसार सुरू झाला. नव्या संसारांत तुमच्या वृत्ति रमूं लागल्या. नव्या संसाराची काळजी वाहण्यांत तुम्हांला धन्यता वाटूं लागली. तुमचं अगोदर एक लग्न झालं होतं, पहिल्या पत्नीचीं दोन मुलं होतीं, ह्याचंही तुम्हांस विस्मरण पडलं होतं.

घरांत नांव घेण्यासारखी कोणी वडीलधारी माणसं नव्हतीं. एक होती ती तुमची म्हातारी आई. प्रत्येक गोष्टीसाठीं ती दुसऱ्यावर विसंबून असायची. आम्हांस परस्पराचा आधार होता. तिला घरांतली परिस्थिति दिसत होती परंतु तुमच्याविरुद्ध शब्द उच्चारण्याचा धीटपणा तिच्यांत नव्हता. सुनेबरोबर तोंडसुख घ्यायचे तिचे दिवस आतां उरले नव्हते. तिनं आम्हांस जवळ केलं. आईच्या प्रेमाची उणीव तिनं कांहीं अंशानं भरून काढली. पण ही गोष्ट फार दिवस टिकली नाहीं. तिनं आपलं ऐहिक अस्तित्व संपवलं होतं. आम्ही पुन्हां एकदा उघडीं पडलों होतों.

लग्नानंतर एक वर्षानं तुम्हांस पहिलं मूल झालं. ती मुलगी होती. त्यावेळीं मी तीन वर्षांची होते. लागोपाठ तुम्हांला तीन मुली झाल्या. अर्थात मला तीन बहिणी झाल्या असंच म्हणायला हवं. तुमच्या नव्या संसाराचा विस्तार हळूहळूं वाढत होता. घरांत नवीन नवीन चेहरे उगवत होते. नवीन नात्यांतील माणसांची वर्दळ वाढत होती. वर्षाकाठीं वडिलोपार्जित शेतीभातीचं उत्पन्न कोठारांत येत होतं. खाण्यापिण्याची मुळींच ददात नव्हती. परंतु......

गांवच्या मराठी शाळेंत सातवी इयत्ता पास झाल्यावर माझ्या शिक्षणाला पूर्णविराम मिळाला. त्याऐवजीं घरांतील उष्टींखरकटीं काढण्याचं आणि स्वयंपाक करण्याचं घरगुती शिक्षण मला मिळूं लागलं. कांहीं दिवसांनीं घरांतील मोलकरणीला रजा मिळाली. शिवाय दोन गडी होतेच. परंतु विहिरीचं पाणी भरणं, झाडलोट करणं त्यांना निषिद्ध होतं. पहाटेपासून रात्रीं दहा वाजेपर्यंत मी कामाला जुंपलेली असायची. सकाळचे आठ वाजल्यानंतरच तुमचे डोळे झोपेंतून उघडत. तोंवर सकाळचा चहा तयार असे. सावत्र आई आपल्या मुलीं कामाला स्पर्श न करतील ह्याची कसून दक्षता घेई.

सुरेश पणजीला इंग्रजी हायस्कुलांत शिकत होता. एका दूरच्या नातेवाईकाकडं त्याची वर्णी लावली होती. परीक्षा आटोपल्यावर वर्षाकाटीं एकदां तो घरीं यायचा आणि उन्हा-ळ्याची सुटी संपल्यावर परत पणजीला निघून जायचा. माझी घरांत होणारी ससेहोलपट त्यानं प्रत्यक्ष पाहिली होती. तो कांहींच बोलत नसे. मनांतल्या मनांत कुढत राही. कसल्यातरी विचारांत मग्न असे. तो घरीं आला म्हणजे मात्र मला एक प्रकारचं अवसान यायचं. धीर वाटायचा. एकटेपणाची जाणीव नष्ट व्हायची. माझा एक मोठा भाऊहि आहे ही भावना मनांत दृढ व्हायची. दुःखानं विखार-णाऱ्या अज्ञात जखमा भरून निघायच्या.

वर्षे जात होतीं. माझं वय वाढत होतं. विशी उलटण्याच्या मार्गावर होतं. माझ्या सावत्र बहिणी उफाड्याच्या होत्या. मी प्रकृतीनं अगदींच किरकोळ होते. त्यामुळं माझ्या देहाचा भरीवपणा दिसत नव्हता. पण वय कांहीं लपूं शकत नव्हतं. माझ्या वयाची

# दीपावलीच्या सुबुद्ध वाचकांसाठीं

## दीपावली बुद्धिबळ'



दीपावलीच्या असंख्य वाचकांना कांहीं तरी रुचेल, त्यांना आवडेल व वाचक त्याचें कांहीं तरी कौतुक करतील असे प्रयोग 'दीपावली'नें अनेकदां केले आहेत व करत आहे. आनंदाची गोष्ट ही कीं, आमच्या वाचकांनीं आमच्या हरेक प्रयत्नाचें अमाप स्वागत केलें.

असाच एक नवा प्रयोग आम्ही या अंकापासूनच सुरू करीत आहोंत. आमच्या उत्साही वाचकांची ज्ञानसंपदा वाढीस लागावी हा आमचा प्रयत्न नेहमीच असतो. आमच्या आबालवृद्ध सुबुद्ध वाचकाचें शब्दभांडार, शब्दसंचय वाढावा त्याचबरोबर त्यांची करमणूक व्हावी म्हणूनच आम्ही 'दीपावली बुद्धिबळ' नांवाच्या शब्दभेदिकेचा एक अभिनव प्रयोग या अंकापसूनच करीत आहोंत.

ही स्पर्धा सर्वांनांच खुली आहे. ही निःशुल्क असून ह्यांतील यशस्वी पहिल्या पांच विजेत्यांना प्रत्येकी १० रुपयांचीं बक्षिसेंहि ठेवण्यांत आलीं आहेत. आमच्या वाचकांनीं अधिक डोळस व्हावें अशी आमची सहाजिकच अपेक्षा असणार. आमचे वाचक या बुद्धिबळांत भाग घेतील आणि आमच्या प्रयत्नाचें स्वागत करतील ह्याची खात्री आहे..

अंकाच्या शेवटच्या पानावर सविस्तर माहिती पहावी. वाचकांनीं आपले विचार कळविल्यास त्यांचा अवश्य विचार करूं.

—संपादक

एखादी दुर्देवी लग्नाची मुलगी गांवांत नव्हती. गांवभर मी चर्चेचा विषय होते. परंतु तुम्हांला त्याचं कांहीं वाटत नव्हतं. तुमच्या दृष्टीनं मी एक मोलकरीण होतें. साधी मोलकरीण. त्याहूनहि हीन दर्जाची. कामाला कंटाळून एकवेळ मोलकरणीनं काम सोडून दिलं असतं. स्वाभिमानानं जगण्याचं स्वातंत्र्य तिलाहि आहे. परंतु आम्ही घरंदाज मुली. मी कुठं गेले असते ? बापाविरुद्ध उघड उघड बंड करण्याचं धाडस आम्हां खेडवळ मुलींत नाहीं. जन्मल्या कुळांत आणि दिल्या घरांत मुकाट्यानं जीवन कंठणं एवढंच आमचं काम.

वेड्या मायेनं कळवळणारे माझे आजोबा तुमच्या दारीं महिन्याकाठीं एक दोन खेपा टाकायचे. माझी उजवण करण्याबद्दल परोपरीनं सांगायचे. वात्सल्याच्या पोटीं निर्माण झालेली लाचारी व्यक्त करायचे ! परंतु तुमच्या अगदीं हुकमी अडचणी असायच्या. सबबींचं तंत्र ठरलेलं असायचं. शेवटीं असहाय्यतेचे चार अश्रू माझ्यासमोर गाळून ते जायचे.

मधल्या काळांत गोमंतकाच्या स्वातंत्र्य-लढ्यानं बरंच उग्र स्वरूप धारण केलं. भूमिगत कार्यकर्त्यांच्या चळवळींना जोर आला. हिंसक घटनांमुळं सर्वत्र भीतिग्रस्त वातावरण पसरलं होतं. अशावेळीं सुरेश अचानक बेपत्ता झाल्याची बातमी तुमच्या कानावर आली. मॅट्रीकचं वर्ष सोडून तो भूमिगतांच्या गटांत सामील झाला होता. तुमच्या दृष्टीनं ही घटना विशेष महत्व देण्यासारखी नव्हती. दिवसभर थोडीसी आदळआपट झाली तेवढीच. नालायक कार्टे जन्मल्याबद्दल कुळाचा उद्धार झाला. तो मेला तरी तुम्हांला त्याचं कांहीं वाटलं नसतं. वंशाची वाढ करणारे अजून तुमचे चार मुलगे होते. आईचं सावत्रपणहि व्यक्त झाल्याविना राहिलं नाहीं. मी मात्र हाय खाल्ली. मी सर्वस्वी उघडी पडली होते. निराधार बनले होते. त्याच्याच आधारानं मी भावी आयुष्याकडं पाहत होतें. नाहीं तरी मला आणखी कुणाचं पाठबळ होतं ! मातापित्याच्या वात्सल्यभारानं मी आधींच वाकली होते. प्रेमवर्षावानं हरखून गेले होते. तुमच्या स्नेहाचे संपूर्ण निकष लागले होते. सुरेश गेल्यानं मी एका पायानं अधू झाले होते जणूं. रात्रीच्या रात्रीं मी त्याच्या आठवणीनं जागून घालवल्या होत्या. डोळ्यांतील आसवांना क्षणाची उसंत नव्हती. केवळ एकट्या अंधारानं माझं हें दुःख पाहिलं होतं, घरांत अन्य कुणाच्या डोळ्यांत तशा अर्थाचे अश्रु मला दिसले नव्हते.

ह्या घटनेला चार-पाच महिने झाले असतील. एके दिवशीं अचानक पोलिसांचा छापा आमच्या घरावर पडला. तुम्हांला अटक झाली. घराची झडती घेण्यांत आली. विध्वंसक चळवळींत भाग घेतल्याचं सुरेशचं नांव सरकारला कळलं होतं. सुरेशला जिवंत किंवा मृतावस्थेंत पकडण्याचं वॉरंट निघालं होतं. तुम्हांला पोलिस चौकीवर नेण्यांत आलं. मारपीट करण्यांत आली. सुरेशला तुमची सक्रिय फूस असल्याचा आरोप तुमच्यावर करण्यांत आला. अनेक प्रश्न विचारण्यांत आले. आमच्याबद्दलची तुमची अनास्था अधिकच बळावली. सुरेश तुमच्या शब्दांत नसून वाटल्यास त्यांनीं त्याला गोळी घालून ठार करावं, अशा आशयाचं लेखी निवेदन तुम्ही पोलिसांना लिहून दिलं. तुमचं शंभर नंबरी अपत्यप्रेम अशा तऱ्हेनं प्रगट झालं. कसाई केवळ दुसऱ्याच्या गायी मारतो परंतु स्वतः पाळलेली गाय मारतांना तो निश्चित थिरथरेल. थोडा वेळ त्याच्या मनाची चलबिचल होईल. तुमची करणी मात्र त्याहूनही वरचढ ठरली !

सुरेशचं मला अधूनमधून पत्र यायचं. त्याच्यावर पत्ता मात्र कुठलाच नसायचा. त्यामुळं पत्र लिहिणं कठीण व्हायचं. लखोट्यावर बेळगांव, सावंतवाडी किंवा स्थानिक पोस्टाचाहि शिक्का असायचा. तुम्ही माझ्या लग्नाबद्दल कितपत जागरूक आहांत; एखादं स्थळ ठरवलं आहे किंवा कुणाशीं बोलणीं चालू आहेत का, ह्याची तो पत्रांतून वारंवार विचारपूस करी. भूमिगत कार्यकर्त्यांबरोबर तो स्वेच्छेनं रानावनांतून, डोंगरदगडांतून भटकत होता. उन्हातोपांतून फिरत होता. अन्नपाण्याची तमा न बाळगतां खपत होता. मातृभूमीच्या मुक्ततेसाठीं खडतर वनवास भोगत असतांनाही बहिणीच्या हिताची काळजी वाहत होता. परंतु तुम्ही मात्र माझ्या जिवाचा कोंडमार केलात. माझ्या सगळ्या सगळ्या भावना पायदळीं तुडवल्या. माझ्या तारुण्यसुलभ अंतःप्रवृत्तींची तुम्हीं कधीं कदर केली नाहीं. आत्मक्लेशानं माझं काळीज नुसतं फाटूं पहात होतं. आत्महत्येच्या विचारांनीं डोकं सुन्न व्हायचं पण प्रत्यक्ष अविचार कधीं घडला नाहीं.

सुरेशच्या गैरहजेरींत पणजीच्या न्यायालयांत त्याच्यावर खटला भरण्यांत आला. एकवीस वर्षांची सजा त्याला सुनावण्यांत आली. सरकारी गॅझेटमधून अशांचीं नांवं प्रसिद्ध करण्यांत आलीं. गोमंतक मुक्त झाल्याशिवाय त्याला मायदेशीं कायदेशीर प्रवेश नव्हता. सहा वर्षांपूर्वीं त्यानं गृहत्याग केला होता. त्यामानानं त्याचं वय फार लहान होतं. तरीहि सतीचं वाण त्यानं पत्करलं होतं. मातृभूमीबद्दलचं आपलं नितांत प्रेम आणि निष्ठा व्यक्त करण्यासाठीं. त्याला पहाण्यासाठीं माझा जीव तळमळत होता. त्याला कधीं पाहूं शकेन ही आशाच दिवसेंदिवस दुष्कर होत चालली होती. त्याच्या काळजीनं माझा देह अधिकाधिक कृश होत चालला होता. तारुण्यांतील नव्हाळी ओसरली होती. तुमच्या कुळांत जन्म घेऊन पूर्वजन्मींच्या पापांची फेड करीत होतें. पंचविशी उलटली होती. यापुढं वैवाहिक जीवन नशिबीं येईलसें वाटत नव्हतं. दिवसांतून गाडाभर कामं उपसणं एवढंच एक जीवनध्येय आतां माझ्यासाठीं निश्चित झालं होतं.

कालांतरानं गोमंतकाच्या लढ्याचा जोर कमी झाला. भूमिगत कार्यकर्त्यांची पांगापांग झाली. कार्याचा आवेग मंदावला. सुरेश परत घरीं येण्याची आशा नव्हती. त्याला पकडण्याचं वॉरंट होतं. ठिकठिकाणच्या पोलीसठाण्यांना माहिती पुरवण्यांत आली होती. अशा व्यक्तींचे फोटो जवळ बाळगून गुप्त हेर सुगावा काढीत होते.

सुरेशनं मावशीकडं जाण्यासाठीं सरळ मुंबईचा रस्ता धरला. लहानपणापासून आमचा मावशीकडं ओढा होता. त्यानं घर सोडल्याचं तिला माहीत होतं. तिनं त्याला मायेनं जवळ केलं. ममता दाखविली. मातृत्वाचं प्रेमछत्र त्याच्यावर धरलं.

अर्धवट राहिलेलं शिक्षण पुरं करण्याच्या ईर्षेनं सुरेश एस. एस. सी परीक्षेला बसला आणि पास झाला. वरचे दरवाजे त्याला एकापरीनं बंदच होते. सदैव मावशीवर अवलंबून रहाणंही शक्य नव्हतं. तिच्या कुटुंबांत कमावता एकटा अन् खाणारीं दहा तोंडं होतीं. सुरेशचा कॉलेजला जायचा विचार होता. त्यासाठीं पैसा हवा होता. मावशीकडून ती गरज भागणं कठिण होतं. तिला स्वतःचा संसार होता. शिक्षण घेणारीं घरांत तीन-चार मुलं होतीं. सुरेशनं तुम्हांला पत्र पाठवलं होतं. कॉलेज शिक्षणासाठीं त्यानं पैसे मागितले होते. संपूर्ण वस्तुस्थिति त्यानं पत्रांत निवेदन केली

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

होतीं. अशावेळीं तुमचं कांहीं कर्तव्य होतं का ? पण तुम्ही काय केलं. पैसे तर पाठवले नाहींच. दोन ओळींचा चिटोरा देखील धाडला नाहीं. त्यानंतर एकावर एक अशीं चार पत्रं आलीं. तुम्हांला त्याचं महत्व नव्हतं. तुमचा आकस कायम होता.

सुरेशनं कॉलेजचा नाद सोडून दिला. अन्य सारे विचार गौण मानून सरळ नोकरीच्या शोधांत लागला. दैवानं त्याला हात दिला. अल्प प्रयत्नांतीं एका खाजगी फर्ममध्यें त्याला नोकरी मिळाली. जीवनाला थोडसं स्थैर्य आलं. परंतु जबाबदाऱ्या संपल्या नव्हत्या. माझ्या-बद्दलचं तुमचं आठमुठेपणाचं धोरण त्याला माहीत होतं. तुमच्या निर्ममतेची साक्ष बऱ्याचदां पटली होती.

—आणि एक दिवस सुरेशचं मला पत्र आलं. पत्रांतील मजकूर अगदीं अनपेक्षित होता. तातडतोब मुंबईला निघून येण्याबद्दल त्यानं लिहिलं होतं. प्रसंगीं तुम्ही मला विरोध कराल, तरीहि तुमची आज्ञा न जुमानण्याविषयीं निक्षून लिहिलं होतं. मी बुचकळ्यात पडले होते. गोंधळले होते. आणि धास्तीहि वाटली होती. पत्राचा अचूक अर्थ लावणं माझ्या आकलन-शक्तीच्या बाहेरचं होतं. त्याला भेटण्याची किती उत्कंठा होती मला ! परंतु तसा योग नजीकच्या काळांत अपेक्षिणं निव्वळ मूर्खपणा होता. तो सुखरूप असल्याचं ऐकून मनांतल्यामनांत मी समाधान मानीत होते. आजोबांना मी तांतडीचा निरोप पाठवला. ते त्वरित आले. त्यांच्याकडं मी तें पत्र दिलं. तें वाचून त्यांना कांहीं वेगळा साक्षात्कार झाला. तुम्ही नाखुष असतांनाहि त्यांनीं मला मुंबईला पांचवण्याची सगळी व्यवस्था केली.

मी मुंबईला आले. मावशयाचा ओळखीनं सुरेशनं माझ्यासाठीं एक स्थळ पाहिलं होतं. वराकडील माणसं मला पाहायला यायची होतीं. पसंतीचा शब्द आल्यास लगेच लग्नाच्या तयारीस लागायला हवं होतं आणि घडलंही तसंच. सुरेशपुढं मोठा बिकट प्रश्न पडला. पत्करलेल्या जबाबदारींतून पार पडायचं कसं ? वराची हुंड्याबिंड्याची कांहीं मागणी नव्हती. तरीही लग्नकार्य म्हटलं कीं खर्च आलाच. तुमच्या कानावर ही गोष्ट घालणं अर्थात् क्रमप्राप्तच होतं. त्यानं ही आनंदाची बातमी तुम्हांस एक्स्प्रेस पत्रानं कळवली. मोठ्या आशेनं तो पत्रोत्तराची वाट पहात राहिला. त्याला वाटलं होतं. नव्हे, त्याची खात्री होती. माझ्या लग्नाचं जुळल्याचं ऐकून तुम्हांस खचित आनंद होईल. तुम्ही त्याचं कौतुक कराल. सारी कामं बाजूला सारून मुंबईला याल. नियोजित कार्य स्वहस्तें पार पाडाल. परंतु सुरेशची ही आशा किती भ्रामक होती ! लवकरच त्याला ह्याचा पडताळा आला. आठ--दहा दिवस थांबूनही तुमचं पत्रोत्तर आलं नाहीं म्हणून दुसरं पत्र पाठवलं. जवळजवळ महिनाभर अशीच पुनरावृत्ति होत राहिली. पण दोन शब्दांत देखील तुमचा कांहीं निर्णय कळला नाहीं. पत्र न लिहून तुम्हांला जें साधता आलें तें पत्र लिहून साधतां आलें नसतें हेंहि तितकेंच खरें.

मुहूर्त ठरविण्याबद्दल वरपक्षाकडील मंडळीनं लकडा लावला होता. प्रसंग आणीबाणीचा होता. पैशाच्या अभावीं कार्य उरकून घेणं अशक्य होतं. सुरेशची त्रेधा उडाली. त्याच्या शिल्कींत अवघे चारशें रुपये होते. अजून याहून मोठ्या रकमेची गरज होती. थोडीसी भांडीकुंडी, एखादा दुसरा दागिना, नवऱ्या मुलासाठीं कापडलत्ता विकत घ्यायचं म्हटलं तरी पैशाचा बराच व्यय झाला असता. इतके पैसे आणायचे कोठून ? कर्ज काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतं. सुरेशला कर्जाचे व्यवहार जमायचे कसे ? घराण्याची इभ्रत आणि प्रतिष्ठा गुंडाळून ठेवून लाचारीनं दुसऱ्यासमोर तोंड वेंगाडायला हवं होतं. अखेरीस तेंच करावं लागलं. दोन--तीन माणसांकडून पैशाची जमवाजमव करावी लागली. खर्चाच्या बाबी पाहतां कांहीं गोष्टींना आळा घालावा लागला. इच्छांना मुरड घालावी लागली. लग्न वैदिक पद्धतीनं करण्याऐवजीं तें नोंदणी पद्धतीनं करण्याविषयीं वरपक्षाचं मन वळवावं लागलं.

—आणि शेवटीं माझं लग्न झालं. रजिस्टर लग्न. जो लग्न नांवाचा शब्द माझ्या जीवनांतील स्त्रीत्व हरण करूं पाहत होता; स्त्रीजीवन साफल्याचा पहिला संकेत चुरगळूं पाहत होता; तोच माझ्या आयुष्याला एक नवीन अर्थ प्रदान करून गेला होता. चागलं स्थळ पाहून उजवलेली मुलगी आपल्या बापाला केवळ स्मृतीनं कृतकृत्य व्हावी. परंतु बाबा, तुमचं कृत्य इतकं दुष्कृत्य आहे, कीं तुम्हांला बाप म्हणण्याचीही लाज वाटावी. एखाद्या गरीब बापाच्या पोटीं जन्म घेतला असता तरी निदान लोकलज्जेस्तव कर्ज काढून त्यानं आपल्या मुलीचं लग्न केलं असतं ! पण तुम्हांला लोकलज्जा काय ती समजलीच नाहीं किंवा समजूनही साळसूदपणाचं नाटक कसं बेमालूम वठवत आलांत. केवळ नांवाचा बडेजाव ! श्रीमंतीचा डौल !! खानदानीपणाचा नकली अभिमान !!!

तसं पाहिलं तर तुम्हांला काय कमी होतं ? पैसाअडका, सोनंचांदी, भांडीकुंडी, तांदुळ-धान्य...कशाकशाची देखील वाण नव्हती. घरांत काय येतं आणि जातं हें काय मला माहीत नव्हतं...जगाला माहीत नव्हतं ? सामान्य माणसापेक्षां हजार पटीनं तुमची परिस्थिति समाधानकारक होती; अन् आहे. तुमच्या कुटुंबांतलं हें पहिलं वहिलं लग्नकार्य. कसं धुमधडाक्यानं व्हायला हवं होतं ! दारासमोर सजलेला मोठा मंडप उभारायला हवा होता. संनईच्या स्वरांनीं भोंवतालचं वातावरण निनादायला हवं होतं. पाहुणे मंडळीनं घरदार फुलून जायला हवं होतं. श्लोकांच्या गजरांनीं जेवणावळीच्या पंक्ति एकामागून एक बसायला हव्या होत्या. पण तुम्ही तर अप्पलपोटेपणाचा कहर केलात. कोणत्या स्वार्थापायी तुम्ही वस्तुस्थितीचा गळा घोटलात ? कां बरं स्वतःच्या निर्लज्जपणाचीं लक्तरं बेमुरवतपणं वेशीवर टांगलींत ? क्षुल्लक भातुकलीच्या खेळांत देखील लहान मुलं बाहुला--बाहुलीच्या लग्नाचा गाजावाजा सबंध वाडाभर करतात. आणि माझंहि लग्न झालं...! साऱ्या पंचक्रोशींत ज्याची गणना सधन व्यक्तींत केली जाते त्या रजनीकांत देसायांच्या थोरल्या मुलीचं ! आमच्या कोणत्याच नातेवाईकाला माझ्या लग्नाची माहिती नव्हती. फार काय प्रत्यक्ष तुम्हांलाही ह्या गोष्टीची पुरेशी कल्पना नव्हती म्हणे ! तिथं इतरांबद्दल काय बोलावं ?

एका गोष्टीची मात्र मला उकल होत नाहीं. आम्हां भावंडांशीं तुमचं एवढं वैर कां ? कीं आमच्या आईशीं पूर्वी तुमचा कांहीं दुष्टावा होता ? तिच्या आगमनानं तुमच्या वाढत्या वैभवाचा ऱ्हास झाला किंवा लक्षाधिशाचे भिक्षापति बनून उपासमारीचे दिवस आले ! परिणामीं उद्वेगून त्याचाच सूड तुम्हीं आमच्यावर उगवलात ! मला माहीत आहे. माझ्या आईमुळं तुमचं कोणत्याच प्रकारचं अकल्याण झालेलं नाहीं. उलट कोर्टकज्जात आणि व्यवहार धंद्यांत तुमची सरशीच होत गेली आहे. तरीहि अकिंचनाचं दैन्य तुम्हीं आमच्या नशिबीं आणलंत. अनौरस संततीप्रमाणं वागवलं. माझ्या

...पान ३५ वर

*बुवा रेल्वे लाईन क्रॉस करीत असतांना मरण पावले...' पत्रांतला हा मजकूर वाचून मला धक्काच बसला. कारण माझे......!*

# नवग्रहांची पीडा

—यशवन्त र. इंगळे

म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाहीं. ज्योतिषशास्त्रावर माझा विश्वास आहे. पण पासरीभर पसरलेल्या होरारत्नांच्या ज्योतिषावर माझा मुळींच विश्वास नाहीं. हे स्वतःला होरारत्न म्हणवणारे भविष्यकार आपल्या मनाला येईल त्याप्रमाणें दुसऱ्याचें भविष्य सांगत असतात. मग तें खरें ठरो अथवा खोटें ठरो. वास्तविक जो स्वतःचें भविष्य सांगूं शकत नाहीं तो दुसऱ्याचें काय सांगणार ?

पण आमच्या हिचा ज्योतिषांवर फार विश्वास. ज्योतिषी दिसला कीं हिनें आपली कुंडली त्याच्यापुढें केलीच म्हणून समजा. हस्तरेषा पाहणारा भेटला तर त्याला ही हात दाखविल्याशिवाय राहाणार नाहीं. अर्थात स्वतःचा हात. म्हणजे माझा ज्योतिषांवर विश्वास नाहीं तर हिचा ज्योतिषांवर हटकून विश्वास. ज्योतिषाच्या बाबतींत तिच्यांत आणि माझ्यांत असें उत्तर आणि दक्षिण ध्रुवाचें अंतर.

कदाचित् परस्परांतील या विभिन्नतेमुळें आम्हीं उभयतां एकमेकांकडे आकर्षिलों गेलों असावें व तिनें माझ्या गळ्यांत आणि मी तिच्या गळ्यांत माळ घातली असावी. इंग्रजी शाळेंत इलेक्ट्रिसिटी शिकवितांना आम्हांला असें सांगण्यांत आलें होतें कीं इलेक्ट्रिसिटीचीं विभिन्न टोकें परस्परांना खेंचतात तर सारखीं टोकें एकमेकांपासून दूर होतात. बहुधा सायन्सच्या या नियमाला अनुसरून तिच्यांतील ज्योतिषाचा आस्तिकपणा व माझा नास्तिकपणा यामुळें आम्हीं उभयतां लग्नाच्या बेडीनें जखडले गेलों असावें.

ही मला नेहमीं म्हणायची एकदां ज्योतिष्याला पत्रिका दाखवून पहा ना तो काय सांगतो तें...

त्यावर मी तिला म्हणत असे, 'ज्योतिषी काय सांगणार माझें भविष्य ? डोंबलाचें ? त्याला स्वतःचें तरी भविष्य सांगतां येईल ? तर मग तो दुसऱ्याचें सांगेल.'

त्यावर ती थोडा वेळ गप्प बसत असे. परंतु कांहीं काळ लोटल्यावर ती पूर्वपदावर येत असे. ती मला म्हणत असे, 'पहा ना, माझ्या मोठ्या भावाचें—वसंताचें ज्योतिष्यानें सांगितलेलें भविष्य कसें बरोबर उतरलें ! त्याला म्हणे एका ज्योतिष्यानें तूं पुढील वर्षी इंग्लंडला जाशील असें सांगितलें होतें. त्याप्रमाणें गेल्याच वर्षी तो विलायतेला गेलासुद्धां.'

'आणि तुझ्या बाबतींत ज्योतिष्यानें काय भविष्य वर्तविलें होतें ? माझ्यासारखा नवरा मिळेल असंच ना ?'

'तुमचं आपलं कांहीं तरी,' 'सुरेखा लडीवाळपणानें म्हणाली, 'पण तें राहूं द्या. आज आपल्याकडे प्रसिद्ध होरारत्न ज्योतिबा वर्तक येणार आहेत तुमची पत्रिका पहायला. मी त्यांना मुद्दाम आज बोलाविलें आहे. परवां ते मोठ्या जाऊबाईकडे आले होते. त्यांची येण्याची वेळ झाली आहे. घाटकुपरहून येणार आहेत ते.'

तितक्यांत दरवाजावरील इलेक्ट्रिक बेल वाजली.

'आलेच वाटतं.' सुरेखा म्हणाली. आणि तिनें दार उघडलें, तो ज्योतिबा हजर.

'शंभर वर्षें आयुष्य आहे तुम्हांला, जोतिबा. आतांच तुमची आम्ही आठवण काढली होती,' सुरेखा.

'शंभर वर्षें नाहीं; पण ऐंशीं वर्षें आहे खास. म्हणजे आजपासून आणखी वीस वर्षें. माझ्या पत्रिकेवरून मला ऐंशी वर्षें पुरी होतांच मृत्युयोग आहे आणि तोहि कसा सांगून येणार.'

'काय मृत्यु सांगून येणार ?' सुरेखानं आश्चर्यचकीत होऊन विचारलें.

'मृत्यु सांगून येणार म्हणजे मी आजारी पडून मरणार आहे; एकाएकीं जाणार नाहीं,' ज्योतिबा वर्तकांनीं स्पष्टीकरण केलें.

'अस्स, आतां आलं माझ्या लक्षांत,' सुरेखा बोलली, 'बरं तें राहूं द्या, हे आमचे मिस्टर. यांची पत्रिका पहावयाची व पत्रिकेंत काय काय योग आहेत तें स्पष्ट सांगायचें.'

'तें काम माझं. कुठं आहे कुंडली ? आणा पाहूं. मी अगदीं अचूक भविष्य सांगतों. माझं भविष्य चुकलं तर मी नांवाचा ज्योतिबा

वर्तक नाहीं. आजपर्यंत शेंकडों लोकांच्या पत्रिका पाहिल्या आणि बहुदेकांचें भविष्य बरोबर उतरलें आहे. मी स्वतःची बढाई मारतो असा तुम्ही गेरसमज करून घेऊं नका.' ज्योतिबांनीं प्रस्तावना केली.

'अहो, ज्योतिषीबुवा, स्पष्ट बोलतों म्हणून रागाऊं नका. पण मी विचारतों भविष्य सांगून—उद्यां काय घडणार तें सांगून उपयोग काय? जें घडणार आहे तें थोडेंच टळणार? होणारें न टळेल जरी ब्रह्मा तया आडवा. जर भविष्य बदलता येण्यासारखें असेल तर तें समजून कांहीं तरी उपयोग होईल. तसं नसेल तर भविष्य समजून निष्कारण चिंता करीत बसायचं मला नाहीं पसंत. उलट अज्ञानांत जे चार दिवस सुखाचे जायचे ते तुमच्या भविष्यामुळें कदाचित् जाणार नाहींत,' मी माझ्या मनांत होतें तें ज्योतिषीबुवांना स्पष्ट सांगून टाकलें.

'असं कसं म्हणतां साहेब,' ज्योतिबा वर्तक म्हणाले, 'भविष्य कां नाहीं बदलतां येणार? डॉक्टर अथवा वैद्य लोक एखाद्या रोगाचें निदान करून त्याजवर योग्य तो औषधोपचार करून रोग बरा करतात कीं नाहीं? अगदीं तसं आहे आमचं. कोणाला कोणत्या ग्रहाची कशी नि किती पीडा आहे तें पाहून ती दूर करण्यासाठीं कोणतीं व्रतें नि तपें केलीं पाहिजेत तें आम्ही ज्योतिषी लोक सांगूं शकतों.

'खरं सांगायचं, ज्योतिबाबुवा, म्हणजे माझा स्वतःचा या गोष्टींवर मुळींच विश्वास नाहीं. तसा मी नास्तिक नाहीं. पण मला हीं धार्मिक थोथांडें पसंत नाहींत. मी विचारतों, 'परमेश्वर जर एक आहे तर मग अमुक देवाची पूजा केली तर तो पावतो, अमुक देवाची आराधना केली तर तो संतुष्ट होतो या म्हणण्यांत अर्थ काय? स्वतःच्या आराध्य देवतेला सोडून बरेच सुशिक्षित लोक भलत्याच देवांच्या मागें लागतात,' मी म्हणालों, 'आतां हेंच पहाना, माझे एक दोस्त श्री. शहाणे वकील मॅजिस्ट्रेटची जागा मिळावी म्हणून स्वतःच्या देवाला सोडून बांद्र्याच्या माऊंट् मेरीला नवस करायला गेले होते म्हणतात. 'त्यांचा तो नवस कितपत फळाला येणार तें दिसतंच आहे म्हणा, माझे दुसरे एक मित्र श्री. करकरे हे वर्षांतून दोनदां तरी शिरडीला जाऊन आल्याशिवाय रहाणार नाहींत. मला या शिकल्या-सवरल्या लोकांची खरोखरींच कींव येते. मी मात्र एक जाणतों. आपली जी आराध्य देवता असेल—कुल देवता असेल तिचेंच रोज मनापासून पूजन करावें.'

'तुम्ही म्हणतां तें जरी खरें असलें तरी निरनिराळ्या रोगांचे डॉक्टर जसे निरनिराळे, तसेच निरनिराळ्या फलप्राप्तीसाठीं निरनिराळे देव आहेत,' सुरेखानें मधेंच तोंड घालून मला शिकविण्याचा प्रयत्न केला, 'तें कांहीं नाहीं चालायचें. हे ज्योतिषीबुवा पत्रिका पाहून जें कांहीं आज सांगतील तें तुम्ही दुसऱ्या कोणासाठीं नसलें तरी माझ्यासाठीं हें केलेंच पाहिजे. तुम्हांला माझ्या गळ्याची शपथ आहे.'

पत्नीनें एवढा आग्रह धरल्यावर—एवढें टांसून सांगितल्यावर कोणता सुशिक्षित पति तिच्या मनाविरुद्ध करायला धजेल? मी मुकाट्यानें माझी कुंडली ज्योतिषीबुवांना दाखविली.

ती त्यांनीं मोठा गंभीर चेहरा करून आपल्या चष्म्याच्या कांचांतून न्याहळून पाहिली. मग थोडावेळ मनांतले मनांत कांहीं हिशोब केला. पुन्हा कुंडलीवरून नजर फिरविली. पंचांग उघडून पाहिलें. त्यांच्या या वागण्याचा माझ्या निर्ढावलेल्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. पण सुरेखा कांहींशीं गडबडलेली दिसली. तिचा चेहरा एकदम गंभीर झाला.

सुमारें पांच मिनिटांनीं ज्योतिषीबुवा म्हणाले, 'तुम्हांला नवग्रहांची बाधा आहे. तुमचा मंगळ उच्चीचा नसल्यामुळें व शनि अष्टमांत येत असल्यामुळें......'

'अहो, ज्योतिषीबुवा, मला तुमच्या या ग्रहांशीं काय करावयाच आहे? मला तुमच्या या ग्रहांत मुळींच गति नाहीं. मी काय केलें पाहिजे तेवढेंच सांगाना एकदांचें,' मी चिडून बोललों.

'तेंच तर सांगणार आहे मी. पण असें चिडून कसें चालेल? मी काय सांगतों तें आपणाला कळावें-पटावें म्हणून मला ही प्रस्तावना करावी लागत आहे,' ज्योतिबा वर्तक बोलले.

'मला तुमची प्रस्तावना नको,' मी कांहींसा रागानें म्हणालों.

'बरं तर. तुम्ही काय केलं पाहिजे तेंच मी सांगून टाकतों.' ज्योतिषीबुवा वदले, 'तुम्हांला नवग्रहांची शांति केली पाहिजे. त्यासाठीं नऊ दिवस मला कांहीं विधी करावे लागतील. ते वाटल्यास इथं करतों नाहींतर मी माझ्या बिऱ्हाडीं करीन.'

'तुम्ही आपल्याच बिऱ्हाडीं करा. इथं कांहीं तें जमणार नाहीं. पण त्यासाठीं एकूण खर्च काय येईल?' मी जरा भीतभीतच प्रश्न केला.

'खर्च तसा फारसा येणार नाहीं,' ज्योतिबांनीं उत्तर दिलें, नऊ दिवसांची दक्षणा व सामानासुमानाचे मिळून अठरा रुपये होतील. उद्यां गुरुवार चांगला दिवस आहे. ग्रहांची योजनाहि उद्यां उत्तम साधते. तेव्हां उद्यांपासूनच कामाला लागतो. शुभस्य शीघ्रम्.'

'उद्यांपासूनच सुरुवात करा, इतका वेळ स्वस्थ उभी असलेली सुरेखा बोलली.

'होय, उद्यांपासूनच करतों. पण आपण संकल्प सोडला पाहिजे. म्हणजे उद्यांपासून मला कार्याला लागायला हरकत नाहीं.' घाईवर येऊन ज्योतिबा म्हणाले.

'संकल्प सोडला पाहिजे म्हणजे काय करायचें?' मी ज्योतिषीबुवांना प्रश्न केला.

'विशेष कांहीं नाहीं. लोहपात्रांत थोडेसें तिळेल ओतून त्यांत तुम्ही आपलें मुख पहावयाचें व दक्षणा म्हणून नऊ रुपये माझ्या हातावर ठेवायचे. म्हणजे बाकी सर्व विधी मी माझ्या बिऱ्हाडीं करून दहाव्या दिवशीं तीर्थ-प्रसाद घेऊन आपली पुन्हां भेट घेईन--' ज्योतिषीबुवांनीं जणुं कांहीं आम्हांला फारसें कांहीं करावयाचें नाहीं असें भासविण्याच्या हेतूनें सांगून टाकलें.

'पण लोहपात्र कोठून आणावयाचें यावेळीं?' मी विचारलें.

'घरांत तवा आहे ना? तो चालेल. लोहपात्रच तें,' ज्योतिबा वर्तक बोलले.

मग सुरेखानें तव्यांत थोडें तेल ओतून तो ज्योतिषीबुवांपुढें केला. मी हातपाय धुतले. स्नान सकाळींच केलें होतें. ज्योतिबांच्या सूचनेनुसार तव्यांतील तिळेल तेलांत स्वतःचें मुखमंडल पाहिलें. द्रव पदार्थांत स्वतःचें तोंड मुद्दाम पहाण्याचा माझा तो पहिलाच प्रसंग असावा.

मग ज्योतिषीबुवांना त्यांची दक्षणा म्हणून आगाऊच ९ रुपये दिले. त्यांनीं तवा उचलून स्वतःच्या हातांत ठेवायला सांगितलें. मी त्याप्रमाणें तो त्यांच्या हातांत दिला. मला वाटलें ज्योतिबा तवा परत








करतील, पण तें कसला तवा परत करतात ! माझ्याकडून एक जुनें वर्तमानपत्र मागून घेतलें. तेलासह तो त्यांत बांधला व घरीं घेऊन गेले. जातांना ते म्हणाले, ' उद्यांपासून पहा तुमच्या प्रकृतींत कसा फरक पडत जाईल तो.'

ज्योतिषीबुवा निघून गेल्यावर मी सुरेखाला म्हणालों, ' काय थोथांड आहे या ज्योतिषांचें ! तुझ्यासारख्या बायका यांना भेटतात म्हणूनच तर यांचें आयतेंच फावतें.'

' तुम्हाला जिकडे तिकडे थोथांडच दिसतें,' सुरेखा चिडून बोलली. मग आमचें बोलणें तेवढ्यावरच थांबलें.

संध्याकाळीं प्रथम बाजारांत जाऊन नवीन लोहपात्र म्हणजे तवा विकत आणावा लागला. नाहींतर दुसऱ्या दिवशीं पोळ्याशिवाय भात खाऊनच ऑफीसांत जावें लागलें असतें.

दुसऱ्या कीं तिसऱ्या दिवशीं मी सकाळीं उठतांच सुरेखा मला म्हणाली, ' काल रात्रीं मला कशी गाढ झोंप लागली होती. अशी झोंप अलिकडे कधींच मला मिळाली नव्हती. बहुधा नवग्रह शांतीचाच हा हळूहळू परिणाम होत असावा.'

' अग, पण नवग्रहांची शांति आहे ती माझ्या आरोग्यासाठीं. मला तर नऊ रुपये नि तव्याचा सव्वा रुपया गेल्यापासून गेले दोन दिवस कशी चांगली झोप लागली नाहीं,' सुरेखाला चिडविण्यासाठीं मी म्हणालों.

' तुमचें हें नेहमीचेंच असें आहे. मी बोलेन त्याच्या उलट कांहीं तरी बोलायचें. अहो, नऊ दिवस तर पुरे होऊं द्या आणि मग पहा प्रकृतिस्वास्थ्यांत कांहीं फरक पडतो कीं नाहीं. रात्रीं तूप खाऊन सकाळीं आरशांत मुख पाहिलें तर फरक तो काय दिसणार !' मला निरुत्तर करण्याच्या हेतूनें सुरेखा बोलली.

याप्रमाणें बहुधा रोज आमचें नवग्रहशांतीबाबत बोलणें चालायचें. अखेरीस एकदांचे नऊ दिवस संपले. दहावा उजाडला व मावळलाहि. निदान अकराव्या दिवशीं ज्योतिषीबुवा येतील म्हणून वाट पाहिली. चुकामूक होऊं नये म्हणून त्या दिवशी आमच्यापैकीं कोणी ना कोणी तरी घरीं होतें.

आणखी दोन दिवस वाट पाहून मी ज्योतिषी वर्तकांना एक चार ओळींचें कार्ड लिहिलें. त्यांचा पत्ता लिहून घेतला होता म्हणून बरें झालें. नवग्रहशांतीचें काय झालें, असें मी त्या कार्डांत विचारलें होतें.

त्यानंतर तिसऱ्या कीं चौथ्या दिवशीं पोस्टानेंच उत्तर आलें. तें पाहून मला तर धक्काच बसला. त्यांत कोणीतरी लिहिलें होतें, सुमारें दोन आठवड्यांपूर्वीं ज्योतिषी रेल्वे लाइन क्रॉस करतांना गाडीखालीं सापडून मरण पावले.

मी तें कार्ड सुरेखाला दाखविलें. तें वाचून ती हळहळली नि म्हणाली, ' बिचारे ज्योतिषीबुवा गेले. तुमची नवग्रहांची पीडाच आपल्याबरोबर घेऊन गेले असावें.'

' पीडा कसली नेतात ते ! पीडा मागें टेवली नि तवा आणि नऊ रुपये मात्र घेऊन गेले ' मी उत्तरलों.

●●●

---

...पान ३२ वरून

उभ्या आयुष्याचं मातेरं करण्याचा घाट घातलात. माझ्या भावनांशीं क्रूरपणं खेळलात. एका कुटुंबवत्सल पित्याच्या मनांत आपल्या अपत्यासंबंधीं इतकी अमानुष, आसुरी भावना सातत्यानं वास करूं शकते, ह्याचं प्रत्यक्ष उदाहरण मला तुमच्या रूपानं पहायला मिळालं. हे सर्व तुम्हीं कोणत्या हेतूनं केलं, त्यामागं कोणतं प्रयोजन होतं याबद्दलचीं प्रश्नचिन्हें मात्र माझ्या मनांत तशींच निरुत्तर स्वरूपांत राहिलीं आहेत.

माझा ठाम निर्धार आहे. तुमच्यासारख्या कर्तव्यशून्य बापाच्या वराचा उंबरठा यापुढं कधींही चढायचा नाहीं. विधात्यानं ज्याच्याशीं माझी ब्रह्मगांठ घातली त्या माझ्या जोडीदारासाठीं मी माझा देह चंदनाप्रमाणं झिजवीन. लग्नाच्या क्षणापर्यंत मी सुखवस्तु असूनही गरीब होते. परंतु आज खरोखरच मी गरीब आहे. तरीही गरिबीच्या मळ्यांत सौख्याचं भरघोस पीक काढण्यासाठीं अविश्रांत झटत राहीन. एकवेळ हक्काचं अन्न खाऊन समाधान मानीन. त्यांतच मला अभिमान आहे, गौरव आहे. तथापि अखेरचं एक पत्र मला तुम्हांस लिहायचं आहे. माझं लग्न झालं, हें वृत्त मला स्वतः तुमच्या कानीं घालायचं आहे. मुलीच्या जन्माला येऊन आजवर मुकाट्यानं सहन केलेला अन्याय आणि अपमान माझ्या कुढलेल्या मनाचा कप्पान् कप्पा व्यापून राहिला आहे. त्यामुळं माझं मन अधू बनलं आहे. रोगट झालं आहे. त्यावर त्वरीत इलाज योजिला पाहिजे. बंदिस्त विकारांना वाट मोकळी करून दिली पाहिजे. त्याचं विरेचन करायचं आहे...मला पत्र लिहायचं आहे.

●●●







अनुक्रमणिका

# माझा होशिल का ?

नरेन्द्र बल्लाळ

**१९५० सालच्या दीपावली वार्षिकांत अत्यंत गाजलेल्या श्री. पु. भा. भावे यांच्या ' अकुलिना ' या सुप्रसिद्ध कथेचा नवा रुपेरी आविष्कार**

**'माझा होशिल का ?'** या चित्रपटानें मराठी चित्रपटसृष्टींत निर्भेळ प्रेमकथेचें नवें दालन उघडलें, असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति ठरूं नये. यापूर्वी गाजलेल्या अभिजात मराठी चित्रपटांची नामावली डोळ्यापुढें आणली, म्हणजे ' माझा होशिल का ? ' हा कथादृष्टया चित्रपटसृष्टींतील एक महत्त्वाचा टप्पा ठरेल, हें मान्य केलें पाहिजे.

' अकुलिना ' ही पु. भा. भावे यांची दीर्घ-कथा कांहीं वर्षांमागें ' दीपावली ' वार्षिकांत फार गाजली. तिचेंच हें चित्रपट रूपांतर. मूळ कथा पत्ररूप असल्यानें तींत उल्लेखिलेल्या अनेक प्रसंगांना पडद्यावर दृश्यरूप करतांना मूळ कथेंत बरीच नवी भर घालण्यांत आली आहे. ' अकुलिना ' ही फक्त मधु बर्वे आणि सुरंगा शिरोडकर यांची स्वतः मधूनेंच सांगितलेली कथा आहे. तर येथें ती मधु सांगत नाहीं. अर्थातच पडद्यावर ती आत्मनिष्ठ न राहातां वस्तुनिष्ट स्वरूपांत दिसते. त्यामुळें सुरंगाची आई आणि तिचा दारुड्या भाऊ हीं पात्रें पूर्णतया नव्यानें निर्माण झाली. मधूचा मित्र बानर्जी याची व्यक्तिरेखा मुळांतल्यापेक्षां अधिक ठसठशीत झाली, तीहि यासाठींच.

कॉलेज जीवनांत कमू प्रधानकडून मधु बर्वेचा प्रेमभंग होतो. तो आत्मघात करायला निघालेला असतां त्याचा मित्र बानर्जी त्याला प्रेमापेक्षां कर्तव्य श्रेष्ठ असल्याची जाणीव करून देतो, आणि डॉक्टरकीचा अभ्यास करण्यासाठीं त्याला मुंबईला आणतो. तिथें मधु बानर्जींच्या खोलीवर उतरतो. हुषार व यशस्वी विद्यार्थी म्हणून नांव मिळवलेला बानर्जी तिथें त्याला आपलें तत्त्वज्ञान सांगतो. ' सक्सेस ॲट एनि कॉस्ट ', ' फ्रेल्टी, दाय नेम इज् वूमन ', ' अहं ब्रह्माऽस्मि ' इत्यादि वचनांनीं त्याची खोली सजवलेली असते. पण असें असलें तरी पुस्तकांतला किडा बनूं नकोस, असेंहि हा बानर्जी मधूला बजावतो. स्त्री ही केवळ उपभोग्य वस्तु–तिला हृदय नाहीं, वरून कितीहि सुंदर असली, तरी अखेर तो अस्थींचा एक सांगाडा–ही बानर्जींची दृष्टि. आपलें हें तत्त्वज्ञान तो मधूच्या मनावर बिंबवीत असतांनाच सुरंगा शिरोडकर ही सुंदर तरुणी मधूच्या जीवनांत येते. सुरंगा ही एका वेश्येची मुलगी, पण चार पुस्तकें शिकलेली. आपल्या आईच्या धंद्यांचा मनापासून तिटकारा असलेली, त्या गलिच्छ जीवनांतून बाहेर पडून, सुखी संसार सजवण्याचीं स्वप्नें रचणारी कुमारिका. सौंदर्यप्रसाधनांच्या फिरत्या विक्रीचें काम करतांना ती मधूकडे येते. दोघे परस्परांवर लुब्ध होतात. सुरंगा मधूला सर्वस्व देते, तें त्याच्यावर पूर्णपणें विश्वासून. पण बानर्जीनें ' विश्वासघातकी ' स्त्रीजातीबद्दल मधूच्या मनांतील द्वेष पेटता ठेवलेला असतो. अखेर मधु सुरंगाच्या एकनिष्ठ भाबड्या प्रीतीचा अव्हेर करतो. डॉक्टर होतो. परदेशांत जाऊन येतो आणि संसार थाटून यशस्वी होतो. सुरंगा अगतिक होऊन धंदा करूं लागते, आणि त्यांतच आजारी पडून मधूच्या हॉस्पितलांत येते. मधूला तिथें पाहिल्यावर ती आत्महत्त्या करते आणि मधूला पश्चाताप होतो.

' अकुलिना 'च्या कथेचें ' माझा होशिल का ?' मध्यें असं रूपान्तर करतांना भाव्यांनीं आधीं उल्लेखिलेली भर घातली आहे. सुरंगाची आई व तिचा भाऊ हीं दोन पात्रें घातल्यामुळें सुरंगाची व्यक्तिरेखा अधिक स्पष्ट व रेखीव झाली आहे. उलट, बानर्जींची व्यक्तिरेखा मुळातल्यापेक्षां अधिक गडद केल्यानें मधूच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचा कुठेंच आविष्कार होऊं शकत नाहीं. कमू प्रधानकडून झालेल्या विश्वासघातामुळें त्याचा सूड घेण्यासाठीं पेटलेला ' अकुलिना 'मधला मधु येथें दिसत नाहीं. येथें दिसतो, तो सुरंगावर कांहीं काळ खरेंच प्रेम करणारा हळवा मधु. मधु आपल्याशीं लग्न करणार नाहीं, त्यानें आपल्याला फसवलें, हें कळल्यावर त्याच्याकडे आपलें हृदय उघडें करणारी शोकाकुल सुरंगा त्याचें कठोर होत चाललेलें अंतःकरण विरघळून टाकते. ती आवेगानें निघून जाते, तेव्हां तर मधूला पुरताच पश्चात्ताप होतो. ' सुरंगाऽ ' अशी आर्त हांक मारून तो तिला परत आणूं पहातो. म्हणजे मूळ कथेपेक्षां मधूची ही पश्चात्तप्त अवस्था कितीतरी आधीं येते. येथें त्याचा मित्र बानर्जी न येतां तर चित्रपट येथेंच संपता ! पण तसें होत नाहीं. नेमका त्या हांकेच्या क्षणींच आपल्यालाच हांक मारल्याप्रमाणें बानर्जी उपस्थित होतो. आणि मधूच्या श्रीमुखांत देऊन त्याला मागें सारतो

सुरंगाच्या शोकान्तिकेने चित्रपटांस सुरुवात होते, ती अशी. योगायोगानें बानर्जी प्रकट झाला आणि मधूला त्यानें सुरंगाला परत आणण्यापासून परावृत्त केलें, म्हणून सुरंगा एकटी पडली ! पटकथेंतला हा सर्वांत कच्चा दुवा म्हटला पाहिजे. कारण सुरंगाच्या शोकान्तिकेस येथें मधु कारण होत नाहीं. तें काम बानर्जी खलनायकाप्रमाणें बजावतो. मधु–सुरंगा यांचें प्रेमप्रकरण चालूं असतां हाच बानर्जी वेळोवेळीं मधूला ' प्रेम–बिम झूट आहे ' असें सांगून, कमू प्रधानच्या विश्वासघाताची वारंवार आठवण देऊन त्याचा सूडाग्नि पेटत ठेवतो. ऑथेल्लोमध्यें आयागो जें करतो, जवळ जवळ तेंच बानर्जी येथें करतो ! त्यामुळें मधु हा चित्रपटाचा खराखुरा नायक राहातच नाहीं. तो बानर्जीच्या हातांतलें बाहुलें होऊन बसतो. कमू प्रधानच्या विश्वासघातानें स्वतः पेटलेला मधु येथें दिसत नाहीं. सुरंगाच्या दुर्दशेस तो कारणीभूत आहे. हें स्पष्ट होत नाहीं. त्यामुळें सुरंगाइतकीच त्यालाहि प्रेक्षकांची सहानुभूति मिळते, आणि चीड येते ती बानर्जींची. बानर्जींच्या या पत्रानें अशा प्रकारें सबंध चित्रपटच झांकाळून टाकला आहे. एका स्त्रीकडून झालेल्या प्रेमभंगाचा सूड म्हणून मधु बर्वे स्वतः सुरंगाची वाताहत करतो, हें अधिक योग्य, स्वाभाविक आणि हृदयंगम झालें असतें आणि मूळ कथेशीं प्रामाणिकताहि राखली गेली असती.

असें असलें, तरी भाव्यांच्या संवादानीं व कामिनी कदमच्या अप्रतिम अभिनयानें ' माझा होशिल का ?' संस्मरणीय ठरतो.

संवादांत अनेक ठिकाणीं भावे जाणवतात. सुरंगा प्रथम भ्रष्ट होते आणि मंदिराकडे धांव घेते, पुजारी मंदिराचें दार बंद करून निघालेला असतो व तो तिला सांगतों, 'देव झोपले आहेत !' थोड्या शब्दांत अपार आशय सांगून जाणारी भाव्यांची तेजस्वी लेखणी येथें जाणवते समाजपद्धति, धर्म, रूढि आदिंबद्दल भाव्यांचीं कांहीं ठाम मतें आहेत. तीं जेव्हां मधूच्या तोंडून ऐकायला मिळतात, तेव्हां मात्र तेथें मधूच्या मुखानें पु. भा. भावे बोलत असल्याचें स्पष्ट लक्षांत येतें. उलट सुरंगाचे संवाद त्यांनीं अतिशय हळुवारपणें लिहिले आहेत. मधूवर उत्कट प्रेम करणाऱ्या सुरंगाचें अंतःकरण तिच्या प्रत्येक वाक्यांतून व कृतींतून अगदीं सहजपणें, पण तेवढेंच मनोज्ञरित्या व्यक्त होईल, याची भाव्यांनी काळजी घेतली आहे. एकंदरीत त्यांचे संवाद उत्कृष्ट, अकृत्रिम उतरले आहेत. याला गालबोट लागतें, तें शेवटच्या दृश्यांत.

सुरंगाचा मृतदेह ज्या 'कोल्डरूम'मध्यें ठेवलेला असतो, तिथें मधूनें केलेला आक्रोश लांबला आहे. शिवाय मधु तिथें प्रवेश करतो, तेव्हां सुरंगाच्या आवाजांत 'या डॉ.मधुकर बर्वे..' अशी सुरुवात करून टाकण्यांत आलेला संवाद कृत्रिम वाटतो. तें सुरंगाचे शेवटचें पत्र असेल, असें गृहीत धरलें, तरी मधूनें तें वाचतांना दाखवणें अधिक योग्य ठरलें असतें. पण येथें उलट घडतें. मृत सुरंगाचे हें सारें मनोगत व्यक्त झाल्यानंतर तिनें जपून ठेवलेलें आपलें धोतर तिच्या अंगावर पसरण्यासाठीं मधु उलगडतो, तेव्हां त्यांतून एक कागदाची घडी बाहेर पडते, तेंच हें पत्र असावें.

मात्र याच वेळीं 'नेसले पितांबर हरीचा' या गीताची पुनरावृत्ति करून हा प्रसंग हृदयस्पर्शी करण्यांत लेखक–दिग्दर्शक यशस्वी झाले आहेत. ग. दि. माडगुळकरांची असामान्य प्रतिभा या गीतयोजनेंत पुन्हां एकदां प्रकटली आहे. चित्रपट संपतो, तेव्हां त्यांतील सारीं लहानमोठीं वैगुण्यें विसरून याच गीताचा ठसा मनावर घेऊन आपण बाहेर पडतों.

कामिनी कदमनें सुरंगाची भूमिका अत्यंत समरसून केली आहे. सुखी संसाराचें स्वप्न रंगवणारी, पापकर्दमांतून बाहेर पडण्याच्या निर्धारानें धडपड करणारी युवती, तिनें येथें उभी केली आहे. मधूबद्दल आकर्षण वाटत असतांहि मर्यादाभंग होऊं न देणारी शालीन सुरंगा, आणि मधूचा अनावर हट्ट पाहिल्यावर मंदिरांत देवासमोर त्याच्याकडून मंगळसूत्र बांधवून घेऊन नंतर पत्नी म्हणून त्याला सर्वस्व अर्पण करणारी प्रेमवेडी सुरंगा, मधूनें अव्हेरल्यावर हताश झालेली सुरंगा आणि पावसाची पर्वा न करतां भिजत त्याच्या दाराशीं वाट पहाणारी व्रतस्थ सुरंगा, हें तिचें सारे आविष्कार मनोज्ञ आहेत. हृदयस्पर्शी आहेत. तिच्या भूमिकेचा तोल कुठेंहि गेलला नाहीं. ही सुरंगा आपल्या भावनांशीं प्रेक्षकांना एकरूप करून घेते.



त्याच्या मनांत स्वतःबद्दल करुणा आणि आदर निर्माण करते. दीर्घकाल लक्षांत राहील इतकी ही भूमिका कामिनी कदमनें उत्कृष्ट वठवली आहे. रमेश देवचा अभिनय त्या पातळीला पोहोंचत नसला, तरी आज मराठी चित्रसृष्टींत असणारी नायकांची वाण लक्षांत घेतां त्याचा अभिनय उजवा आहे. भूमिका यथायोग्य वठवण्यासाठीं त्यानें प्रयत्नांची कसूर केलेली नाहीं, हेंहि जाणवतें. इंदिरा चिटणीस यांना सुरंगाच्या आईची भूमिका शोभत नाहीं. कारवारी पद्धतीनें त्या बोलल्या असल्या, तरी त्या वयस्क का होईना, पण 'नायकीण' वाटत नाहींत हें खरें !

अनंत माने यांच्या दिग्दर्शनाचें वैशिष्ट्य फारच थोड्या ठिकाणीं दिसते. सुरंगाने वरच्या मजल्यावरून उडी टाकून जीव दिल्यानंतर मधु हॉस्पिटलांत येत असतां, तिनें उडी टाकली त्या ठिकाणीं सांडलेलें तिचें रक्त व बांगड्या यावर त्याचा पाय पडतो, सुरंगाच्या आत्महत्येची बातमी सांगणारी परिचारिका दा [illegible] उभी असते, त्यावेळीं मधूला तिच्या ऐवजी सुरंगा दिसते, हे दोन प्रसंग उत्कट व भावपूर्ण आहेत. उलट सुरंगा आजारी पडल्यानंतर तिची छत्री खुंटीवरून खालीं पडते, तिला भ्रष्ट करण्यांत आल्यावर भिंतीवरून रामपंचायतनाची चौकट निखळून फुटते, मधु सुरंगाच्या मीलनाच्या वेळीं सुरंगानें दिलेल्या देवाच्या चित्राची दिनदर्शिका खालीं पडून त्याखाली बानजींनें लावलेलें अर्धावृत्त स्त्रीचें उन्मादक चित्र दिसूं लागतें ही प्रतीक–योजना फार ढोबळ वाटते. तींत मुलायम सूचकता मुळींच नाहीं. 'मला वाटतें सजवावें घर' या गीताच्या वेळीं सुरंगाच्या गळ्यांत कधीं मंगळसूत्र दिसतें, तर कधीं नुसती सांखळी हें दिग्दर्शनांतील सातत्याचा अभाव दर्शवतें.

वसंत पवार यांचें संगीतही चित्रपटाच्या अंध व शोकात्मक प्रकृतीस मानवणारें नाहीं. 'नेसले पितांबर' आणि 'मला वाटतें सजवावें घर' हीं गीतें त्यांतल्या त्यांत उजवीं. आजारी सुरंगा खणखणीतपणें गाते हें ठीक वाटत नाहीं. तुटक चालीचें व अगदीं कळत नकळत साथ असणारें गीत तिथें चालले असतें. (बिमल रॉयच्या 'देवदास' मधलीं दिलिपकुमारचीं गीतें त्या दृष्टीनें आठवावींत)

हें सगळें असलें, तरी मुळांतील प्रभावी कथा व उत्तम संवाद, आणि कामिनी कदमचें उत्कृष्ट भूमिका यामुळें चित्रपट मनाची पकड घेतो. अंतःकरणाला चटका लावून जातो.

–मात्र असा काव्यात्म, हळुवार प्रीतीचा आविष्कार करणारा चित्रपट बिमल रॉय वा नितिन बोस यासारख्या समर्थ दिग्दर्शकांकडून हाताळला जाता, तर तो कितीतरी हृदयंगम ठरला असता, 'देवदास'ची करुणोदात्त भावनांची सर्वोच्च पातळी त्यानें गांठली असती, आणि कचकड्याच्या पट्टीवरील तें एक अभिजात काव्य ठरलें असतें, हा विचार रुखरुख लावल्याखेरीज राहात नाहीं.

–'अकुलिना'ची खरी शोकांतिका ही आहे !






अनुक्रमणिका

# दोन लाखाचा दरोडा

—शर्विलक



**चिकॅगोतील** ईस्ट-स्ट्रीटवरील ते अलिशान घर. एक धनाढ्य कारखानदार आयर्व्हिंग चॅनेनसनचं तें घर होतं. इतकें दिवस शांतपणें उभ्या असलेल्या त्या घरांत १ फेब्रुवारी १९६२ रोजीं अशांततेची नांदी झडली.

रात्रीचा समय होता. स्वतः आयर्व्हिंग त्यावेळीं घरांत शांतपणें वर्तमानपत्र वाचत बसला होता. त्याचा चौदा वर्षांचा मुलगा लॅरी त्याच्या शेजारीच अभ्यास करीत बसला होता. त्याचे वृद्ध वडील मेयर पाठीमागील खोलींत टेलिव्हिजन पहांत बसले होते. दुसऱ्यां एका खोलींत आयूची बायको ग्लोरीया विणत बसली होती. तिची मुलगी इलीन तिला सहलीच्या गंमती-जंमती सांगत होती.

त्या रात्रीं तरी तें कुटुंब सुखांत होतं. पण रात्रीं अकरा वाजतां त्या सुखासमाधानाला तडा गेला!—

घंटी खणाणली! आयनें वर्तमानपत्र बाजूला सारलें. ह्या अवेळी कोण आलं? म्हणून तोही भ्रमांत पडला. कदाचित् आपला एखादा मित्र आला असेल किंवा कोणी शेजारीही असेल अशी समजूत करून घेऊन त्यानें झटक्यांत दार उघडलें.

दरवाज्यांत मळकट फेल्ट हॅट घातलेला एक माणूस उभा होता! त्याच्या हातांत रंगीबेरंगी दोऱ्यानें गुंडाळलेली एक बॉक्स होती. 'आयर्व्हिंग चॅनेनसनला ही द्यायची आहे.' तो रुबाबांत म्हणाला; 'आपण ह्या कागदावर सही करून बॉक्स् घ्या.'

शनिवारी ३ तारखेला आयर्व्हिंगचा ४९ वा वाढदिवस होता. तेव्हां कोणी प्रेमळ मित्रानें ही भेट पाठविली असावी असं त्याला वाटलं. त्यानें कागदावर झर्रकन् सही केली व बॉक्स् घेतली. तो आता दरवाजा बंद करणार इतक्यांत—

'वन् मिनिट प्लीज.' तो मळकट हॅट घातलेला माणूस म्हणाला, 'आपली बाथरूम कुठें आहे?'

'अस्सं, अस्सं, आंत या ना. दाखवतो.' आयू आतां पुरता जाळ्यांत सांपडला. त्यानें त्या माणसाला बाथरूम दाखविली.

इतक्यांत बाहेर कोणाच्या तरी पावलांची चाहूल लागली म्हणून आयूनें दचकून बाहेर पाहिलें तो त्याला असें दिसलें कीं तीन आसामी बाहेर दरवाज्यांत उभ्या ठाकल्या होत्या! तिघांच्याही हातांत पिस्तुली होत्या. जो पुढें होता त्यानें दाढी वाढविली होती. दुसरे दोघे त्याच्या मागे उभे होते. त्यापैकीं एकानें चिन्यासारखी मिशी राखली होती व दुसरा बुटकेलेसा होता.

हा सगळा प्रकार आयूच्या लक्षांत येण्यापूर्वीच त्या तिघांपैकीं एकजण किंचाळला, 'आम्हीं जे सांगतो त्याप्रमाणें कर नाहींतर प्राणास मुकशील' आणि ते सरळ आंत घुसले. दोघे त्या पितापुत्राजवळ उभे राहिले व तिसरा आंत गेला. ग्लोरीया व इलीन ज्या खोलींत होत्या त्या खोलींत तो गेला. त्या शस्त्रधारी इसमास पाहून त्या दोघी पुरत्याच घाबरल्या. त्या दोघी ओरडूंही शकल्या नाहींत. तो इसम त्यांना दरडावून म्हणाला, 'तुम्हीं दोघीही बाहेरच्या खोलींत चला!' मुकाटपणें त्या तिथून उठून बाहेरच्या खोलींत गेल्या.

इकडे आयू त्या दोघांना चेहऱ्यावरचा घाम पुशीत सांगत होता, 'तुम्हांला पैसे हवेत कां? घ्या! पण आम्हांला मारूं नका. बाजूच्या खोलींत तिजोरी आहे तिथें तुम्हीं जा. त्या खोलींत ७९ वर्षांचे माझे वृद्ध वडील आहेत. त्यांना प्रथम मी सगळं समजावून सांगतो

*‘ आम्हांला हवे आहेत दोन लाख रुपये !! जर तुझ्या कुटुंबांतील सगळीं माणसें तुला जिवंत परत हवीं असतील तर तुला दोन लाख रुपये आमच्यापुढें मोजावे लागतील ! नाहीं तर....’*

कारण त्यांना हृदयाचा विकार आहे.] म्हणून म्हणतो...’

‘ समजलं !’ ज्याला त्याचे सहकारी ‘ ब्रिल ’ म्हणत. तो इसम आयवर खेंकसला व त्यानें आपलें पिस्तुल आयूच्या कुशींत खुपसलें व त्याला दरडावलें, ‘ चल दाखव तिजोरी !’

ते दोघे वृद्ध चॅनेन्सनच्या खोलींत गेले. आपल्या वडिलांना परिस्थितीची गंभीरता आयनें समजावून सांगितली. ती जाणून तो वृद्ध इसम मुकाट्यानें बाहेरच्या खोलींत गेला.

मग आयूनें सगळीं तिजोरी रिकामी केली. अनेक नोटा व चेकस् ह्यांचा जमिनीवर खच पडला ! त्यांतील एकाही चेकला ब्रिलनें हात लावला नाहीं; पण नोटा मात्र त्यानें मोजल्या. दोन हजार रुपयांच्यावर तो ऐवज होता. त्यांतील पांचशे रुपये त्यानें घेतले व आपल्या बुटांत दडवले व उरलेली रक्कम त्यानें हातांत घेतली. म्हणजे मधल्यामध्यें साथीदारांच्या नकळत त्यानें ५०० रुपयांवर डल्ला मारला होता !

नंतर शांतपणें आयू त्याला म्हणाला, ‘ आतां तुम्ही निघून जाऊं शकता. पोलिसांना बोलावण्याच्या भानगडींत मी पडणार नाहीं. तुम्ही निश्चिंत असा.

पण आपल्या पिस्तुलानें एका खुर्चीकडे निर्देश करीत ब्रिल त्याला म्हणाला, ‘ त्या तिथें खुर्चीवर बस आणि मी काय सांगतो तें नीट कान देऊन ऐक. आतां तूं हे जे पैसे आम्हांला दिलें त्याचा आम्ही निव्वळ ‘ बोनस ’ म्हणून स्वीकार करूं. तुझ्या घरांत आज हे एवढें पैसे मिळतील ह्याची आम्हांला कल्पनाही नव्हती. आमच्या मनांत वेगळींच रक्कम आहे. तेवढी आम्हांला मिळालीच पाहिजे. आम्हांला हवे आहेत दोन लाख रुपये ! जर तुझ्या कुटुंबांतील सगळीं माणसें तुला जिवंत परत हवी असतील तर तुला दोन लाख रुपये आमच्यापुढें मोजावे लागतील !’

हें ऐकून आयू ब्रिलवर खेंकसून म्हणाला, ‘पण इतकी रक्कम माझ्याजवळ मुळींच नाहीं ; मग मी ही रक्कम आणूं कुठून ?’

‘ समज उद्यां तुझ्या बायकोवर वा मुलीवर तांतडीनें ऑपरेशन करण्याची वेळ आली तर तुला कुठून तरी पैसे गोळा करावे लागतीलच्च. तसंच समज आणि ह्यावेळीं पैसे गोळा कर. तुला दोन लाख जमवता आले नाहींत तर पावणेदोन लाखही आम्हांला चालतील !’

‘ ब्रिल, मला एवढें पैसे जमवतां येणार नाहींत. माझ्या आवाक्याबाहेर आहे ही रक्कम’ आयू निश्चयानें म्हणाला.

हें ऐकून ब्रिल निर्विकारपणें म्हणाला, ‘आम्हीं इथें उद्यां पहाटे ४–३० पर्यंत आहोंत. मग तुझ्या व्यतिरिक्त तुझ्या कुटुंबांतील सगळ्या माणसांना माझी माणसें एका अज्ञात स्थळीं पळवून घेऊन जातील. त्यासाठीं ते पॉपची स्टेशन–वॅगन वापरतील.’

‘ पॉप !’ म्हणजे ब्रिलला आयूच्या वडिलांचं घरांतील नांव माहीत होतं तर. हें ऐकून खुद्द आयूलाही आश्चर्य वाटलं. दरोडेखोरांना कुटुंबां-तील माणसांची इत्थंभूत माहिती कशी ?

ब्रिल पुन्हां गरजला, ‘ तूं सकाळीं नऊ वाजतां बँकेंत जाऊन आम्हीं सांगितल्याप्रमाणें सगळं केलंस तर दहा वाजेपर्यंत तूं आम्हांला पैसे देऊं शकशील. तुझ्या कुटुंबाची मग आम्हीं मुक्तता करूं पण जर तूं पैसे आणले नाहींस वा दुसरा कांहीं दगाफटका केलास तर –तुझ्या कुटुंबांतील एकही माणूस तुला जिवंत दिसणार नाहीं.’

सुन्न मनानें आयू बाहेरच्या हॉलमध्यें आला. ब्रिल पाठोपाठ होताच. कुठल्याही परिस्थितींत आपण दरोडेखोरांची मागणी पूर्ण करूं शकूं ह्याची आयूला मुळीच खात्री नव्हती. परंतु प्रयत्न करून पहावा म्हणून त्यांना तो समजावूं लागला. पण ब्रिल आणि त्याच्या साथीदारांनीं आयूला दाद दिली नाहीं.

थोडा विचार करून आयूनें दुसरा डाव टाकला, ‘ तुम्हीं सांगतां त्याप्रमाणें जर मी वागलों तर सकाळीं सात वाजतांच तुम्हीं पोलिसांच्या हातांत पडाल. ’

‘ कसें ?’ ब्रिल ओरडला.

‘ माझी एक पुतणी सकाळीं सात वाजतां पॉपला भेटायला येणार आहे. जर तिला पॉप वा दुसरं कोणीही घरांत आढळलं नाहीं तर तिला संशय येऊन ती कदाचित पोलिसांनाही कळवेल. ’ ब्रिल आयूला शांतपणें न्याहाळत असतांनाच आयू पुढें म्हणाला, ‘ दुसरं असं पहा कीं आमचं दुकान रोज सकाळीं ८–३० वाजतां पॉप स्वतः उघडतात. ते ज्यावेळीं ते उघडतात तेव्हां माझ्या भावाच्या घरीं घंटी खणाणते. जर उद्यां तशी घंटी खणाणली नाहीं तर माझा भाऊ म्हणेल, ‘ आज दुकान कां उघडलं गेलं नाहीं ?’ तो मग चौकशी करील.’ आयू पुढें म्हणाला—‘ शिवाय मी ९ वाजेपर्यंत आमच्या कारखान्यांत गेलों नाहीं तर माझे सहकारी मी कां आलों नाहीं म्हणून चौकशी करूं लागतील. बरोबर ९ वाजतां !– कीं ज्यावेळीं मी बँकेत जावं असं तुमचं म्हणणं आहे. म्हणजे तुमच्या लक्षांत आलं ना कीं तुमच्या जिवावर बेतणार आहे. ’

परंतु आयूच्या ह्या सडेतोड युक्तिवादालाही ब्रिल व त्याचे साथीदार बळी पडले नाहींत.

आतां रात्रीचे बारा वाजले होते. ते तिघेही डोळ्यांत तेल घालून पहारा करीत बसले होते. हुं नाहीं कीं चूं नाहीं. घड्याळांत ४–३० कधीं वाजतात इकडे त्या तिघांचं लक्ष होतं.

आयर्व्हिंगला एकच भीति वाटत होती, ती ही कीं पैसे देऊनसुद्धां पळविलेल्या इसमाच्या जिविताला धोका कशावरून नसेल ? ह्या असल्या जीवघेण्या लोकांचा काय भरोसा ? म्हणून तो पुनःपुनः त्या तिघांची समजूत काढीत होता.

शेवटीं जो ‘प्लॅन’ ठरवला गेला तो असा– ‘ पॉप ’ला ते आपल्याबरोबर घेऊन जाणार नव्हते. म्हणजे नेहमीप्रमाणें पॉप दुकान उघडतील, त्यांना सकाळीं त्यांची नातही भेटेल. सगळं कसं व्यवस्थित होईल. आयूनें मात्र सकाळीं ९ वाजतां कारखान्यांत फोन करावा व वेळेवर न येण्याबद्दल कांहीतरी सबब सांगावी.

बरोबर ४–३० वाजले ! तिघे दरोडेखोर उभे ठाकले ! आयूचा आता नाइलाज झाला तरीपण ‘ तुम्हीं कोणालाही दुखापत करूं नका अशी माझी तुम्हांला कळकळीची विनंति आहे’ असं त्यानें त्यांना बजावलेच.

नवऱ्याप्रमाणें चॅनेन्सनबाईंचेही इकडे विचारचक्र चालूं होतें. ‘ बाथरूममध्यें जाऊन येतें ’ असं सांगून त्या आंत गेल्या. बाथरूम-मध्यें गेल्यावर एका कोन्या साबणाभोंवतीं असलेले वेष्टन त्यांनीं सोडलें व त्या वेष्टनावर

लिहिलें— 'मदत ! मदत ! ! आम्हांला ह्या मोटारींतून पळवून नेण्यांत येत आहे. ह्या मोटारीचा पाठलाग करा !' त्याखालीं तिनें आपलें नांव व पत्ता लिहिला. नंतर तो कागद तिनें आपल्या वक्षःस्थळांत दडवून ठेवला. जेव्हां कधीं संधी मिळेल तेव्हां चालत्या मोटारींतून तो कागद रस्त्यांत भिरकावून देण्याचें तिनें ठरविलें.

त्या तिघांना पोलीस घेऊन दरोडेखोरांची मोटार हां हां म्हणतां रस्त्यावरून दिसेनाशी झाली. ब्रिल एकटा मात्र मागें राहिला होता. ब्रिलनें आयूला पुन्हां एकदां सगळा बेत समजावून सांगितला. तो बँकेंतून घरीं परतला कीं त्याला एक फोन येईल. त्यावरून हे पैसे कुठें आणायचे तें ठिकाण त्याला सांगण्यांत येईल. नंतर थोड्यावेळानें दुसरा एक फोन येईल. त्यावरून त्याचें कुटुंब कुठल्या ठिकाणीं आहे तें सांगण्यांत येईल.

बरोबर पांच वाजतां ब्रिल निघून गेला ! जातांना तो आयूला पुन्हां बजावून गेला— 'लक्षांत ठेव ! कोणत्याही प्रकारची गडबड करण्याच्या भानगडींत पडूं नकोस !!'

ब्रिल गेल्यावर 'मला बाथरूम दाखवतां कां ?' असं म्हणणाऱ्या पहिल्या दरोडेखोराचा आयू घरांत शोध करूं लागला. तो बाथरूम-मध्यें तर नव्हताच पण घरांत इतरत्रही कुठें आढळला नाहीं.

कांहीं वेळ गेल्यानंतर आयूनें आपल्या भावाला-सॅम्युअलला फोन केला व परिस्थितीची गंभीरता त्याला समजावून सांगितली. तसेंच बँकेच्या मॅनेजरला भेटून ९ वाजतां रक्कम तयार ठेवण्यासाठीं त्यानें सॅम्युअललाच सांगितलें. 'पोलिसांनाही तूंच सगळं कळव मात्र त्यांना कमालीची दक्षता बाळगण्यास सांग नाहींतर सगळ्या कुटुंबाला धोका पोंचणार आहे' असा शेवटचा खलिता सांगून आयूनें फोन खाली ठेवला.

नेहमींप्रमाणें ८–३० वाजतां पॉपने दुकान उघडलें. ८–४५ वाजतां आयूने कारखान्यांत फोन केला व उशीरा येण्यासंबंधीं सबब सांगितली. ९ वाजतां तो बँकेंत गेला. मॅनेजरनें सगळी रक्कम तयार ठेवली होती. एक गुप्त पोलीस अधिकारीही त्यावेळीं आला होता. त्यानें नोटांचें नंबर टिपून घेतले व तो आयूला म्हणाला, 'दरोडेखोरांभोंवतीं योग्य ती दक्षता घेऊन पोलिसांनी जाळं पसरलं आहे. आपण बिलकुल घाबरूं नका.'

वेळ न मोडता आयूनें सरळ घर गांठलं. कांहीं वेळानं टेलिफोन खणाणला. आयूनें आतुरतेनें फोन उचलला. ब्रिल खड्या सुरांत त्याला सांगत होता—७९ व्या रस्त्यावर असलेल्या पेट्रोलपंपावर पैसे आणून देणें. तूं तुझ्या मोटारींतच बसून रहा. मीं मोटारीजवळ येईन व पैसे घेऊन जाईन. ताबडतोब ये.'

आयू ताबडतोब निघाला. ७९ व्या रस्त्यावरील पेट्रोल पंपाजवळ त्यानें मोटार उभी केली व तो ब्रिलची वाट बघूं लागला. पण इतक्यांत ब्रिल आलाच. त्यानें स्वतः मोटारीचा दरवाजा उघडला व तो आयूच्या शेजारीं बसला. 'आणलेस पैसे ?' तो कुजबुजला. उत्तर देण्याऐवजीं आयूनें त्याच्या हातांत पुडकं दिलं. तिथल्या तिथें ब्रिल पैसे मोजूं लागला.

'हें काय ? २३ हजारच आणलेस ?' ब्रिल खेंकसला.

'माझ्याजवळ इतकेंच होते. दुसऱ्या ठिकाणीं कुठेंही मला पैसे मिळूं शकले नाहींत. मी खूप प्रयत्न केला पण व्यर्थ.' आयूनें खुलासा केला.

'ठीक आहे तर. तूं आतां घरीं जाऊं शकतोस. मी तुला नंतर फोन करून तुझें कुटुंब तुला कुठें सांपडेल तें सांगेन. जा नीघ.' असं म्हणून ब्रिल झटक्यांत मोटारीबाहेर आला. मोटार वेगांत निघून गेली.

आतां खरा आणीबाणीचा क्षण आला होता. दरोडेखोरांना थोडे पैसे मिळाले होते. त्यावर ते संतुष्टही होते. पण आतां ते कुटुंबाचा पत्ता सांगणार कीं नाहीं ? कीं सरळ हुलकावणी देणार ? आयू चिंतातूर मुद्रेनें फोनजवळ बसला होता. त्या एकच टेलिफोनची वाट पहात—ब्रिलचा टेलिफोन !

९–३५ वाजतां ब्रिलचा फोन आला. 'तूं मला वीस हजारच दिले असं तुला कोणीं विचारलं तर तूं सांग.' अशा रीतीनें तीन हजारांवर ब्रिलनें पुन्हां डल्ला मारला होता. पण आयूला हवी होती दुसरी माहिती. तो ब्रिलला म्हणाला, 'माझं कुटुंब कुठं आहे ?' ब्रिल ताबडतोब उत्तरला, 'उत्तरेस असलेल्या 'केनवुड ॲव्हेन्यू' मध्यें जा. दुसऱ्या मजल्यावरील ६५४५ नंबरच्या खोलींत तुला तुझं कुटुंब सांपडेल.'

आयूनें घाईत टेलिफोन खालीं ठेवला व तो 'केनवुड ॲव्हेन्यू'कडे निघाला. परंतु ६५४५च्या खोलींत त्याचें कुटुंब नव्हतें ! म्हणजे दरोडेखोरांनीं त्याला फसवलें ? तो भ्रमिष्टावस्थेंत भटकत असतांनाच 'ॲव्हेन्यु' मधील एक रहिवाशी त्याला म्हणाला, 'तुम्हीं एका बाईला शोधत आहांत ना ?'

'हो !'

'जिच्याबरोबर एक उंच मुलगी व एक लहान मुलगा आहे.'

'हो. तीच !'

'ते तिघेही मघांशीं कोपऱ्यावर टॅक्सी बघत होते. मला वाटतं एव्हांना ते टॅक्सीनें गेले असावेत.'

आयूनें त्या माणसाचे आभार मानले व ताबडतोब जवळचा फोन गांठला. त्यानें आपल्या घरीं फोन केला. त्याला उत्तर त्याच्या बायकोनेंच दिलें. 'आम्हीं सगळें सुखरूप आहोंत. तुम्हीं घरीं या.' त्याची बायको त्याला सांगत होती.

इकडे पोलिसांचा ससेमिरा दरोडेखोरांमागें चालू होता. त्यांनीं इतका कडक बंदोबस्त ठेवला होता कीं चिकॅगोच्या बाहेर दरोडेखोरांना पळून जाणें शक्यच नव्हतं. जेव्हां त्यांना कळलं कीं आयचें कुटुंब सुखरूप घरीं परत आलें आहे तेव्हां कॅप्टन पिअर्सन ग्लोरीयाची मुलाखत घ्यायला आयूच्या घरीं आला.

आपल्या मुलाखतींत ग्लोरीयानें अशी माहिती दिली. 'आम्हांला मोटारींत कोंबून त्यांनीं भरधांव मोटार सोडली होती आणि ती इतकी वळणें घेत होती कीं आम्हीं कुठें जात आहोंत हेंच आम्हांला कळत नव्हतें. इतकेंच काय पण चिट्ठी भिरकवायलाही मला संधी मिळाली नाहीं. नंतर आम्हांला 'केनवुड ॲव्हेन्यू' मधील ६४४५ नंबरच्या खोलींत आणण्यांत आले. म्हणजे माझ्या नवऱ्याला त्यानें खोटा नंबर दिला होता.'

'पुढें काय घडलं ?' पियर्सननें विचारलं.

'त्या खोलींत कसल्याच सोई नव्हत्या. भयाण वाटत होती ती. एक सोफा व एक पलंग त्या खोलीत होता. त्या खोलींत फोन नव्हता म्हणून दर दहा मिनिटांनीं त्या दोघांपैकीं एकजण खाली जायचा व फोन करून यायचा. आम्हीं कुठल्याही प्रकारची गडबड करूं नये असं ते आम्हांला मधून मधून बजावीत. मधून मधून स्वतःजवळचं पिस्तुल ते उगीच चाळवत. त्या तशा स्थितींत उजाडलं कधीं हें आम्हांला कळलंही नाहीं.








' सुमारें दहा वाजतां दोघेही दरवाजा बंद करून बाहेर गेले. पण आंतून आम्हांला असं दिसत होतं कीं कोणीतरी एकजण बाहेर पहारा करतोय म्हणून. पण मागाहून आम्हांला कळलं कीं कुठली तरी वस्तु ठेवून त्यांनीं तशा प्रकारची सांवली निर्माण केली होती. आम्हीं कांहीं वेळ हालचाल केली नाहीं. मग मनाचा हिय्या करून आम्हीं मागील दारी गेलों. पण तें बंद होतं म्हणून मग पुन्हां धाडस करून पुढचा दरवाजा ढकलला तों तो उघडला गेला. जवळपास त्या दोघांपैकीं कोणीही नाहीं. ह्याची खात्री करून आम्हीं दबकत दबकत रस्त्यावर आलो. कधीं गोळीचा आवाज होईल ह्याचा नेम नव्हता. पण तसं कांहीं घडलं नाहीं. तरीही आम्हीं रस्त्यावरून पळत होतो. लांबवर गेल्यानंतर आम्हीं टॅक्सी केली व इथें आलो.'

कॅप्टन पियर्सननें ग्लोरीयाचे आभार मानले व तो निघून गेला.

पोलिसांचं चक्र आतां जोरांत फिरूं लागलं. ' केनवुड अॅव्हेन्यू 'च्या मालकीणबाईकडे त्यांनीं एक माणूस पाठवला. तिनें सांगितलें. ' ६४४५ नंबरची खोली आदल्या दिवशींच दोन निग्रोंनीं भाड्यानें घेतली होती. ते दोघेहि पंचविशींतले होते. ' पण दोघांचेंही सविस्तर वर्णन ती देऊं शकली नाहीं. 'पॉप'ची स्टेशन-वॅगन पोलिसांना ' अॅव्हेन्यू ' जवळच मिळाली पण त्यामुळेंही जास्त माहिती मिळूं शकली नाहीं.

दोन दिवस गेले. शनिवार उजाडला. अजून कांहींच धागे सांपडत नव्हते. पोलिसांनीं एक तर्क करून ठेवला होता कीं मिळालेल्या माहितीवरून दरोडेखोर चॅनेनसन कुटुंबाला पहिल्यापासून ओळखत असावेत. म्हणून त्यांनीं नातेवाईकांच्या जबान्या घेतल्या पण त्या निष्फळ ठरल्या. शेवटीं त्यांनीं दरोडेखोरांची इत्थंभूत वर्णनें वर्तमानपत्रांत दिली व त्यांच्या-बद्दल माहिती देणाऱ्याला मोठें बक्षीस जाहीर केलें.

तशी माहिती घेऊन एक माणूस आला. तो सांगू लागला, ' मी सलूनमध्यें केस कापायला गेलों असतां ज्याला ' केनेथ ' म्हणत असा एक इसम तिथें होता. त्याचे केस कापून झाल्यावर त्यानें शंभर रुपयांची नोट पुढें केली व सुटे पैसे न घेतां तो लगबगीनें सलून बाहेर पडला. तो श्रीमंत असावा असा • मी तर्क केला पण घरीं येऊन तुमची जाहिरात वाचली आणि लक्षांत आलं कीं हा तोच इसम असावा !' त्या सलूनमध्यें पोलिसांनीं आणखी तपास केला पण कसून शोध करून सुद्धां ' केनेथ ' सांपडूं शकला नाहीं !

चॅनेनसन कारखान्यांतील कामगारांचीही पोलीस झडती घेत होते. रविवारी संध्याकाळीं तशी झडती घेत असतांना २८ वर्षांच्या रॉबर्ट हॉल ह्या कामगाराकडे त्यांचें लक्ष वेधलें. गेले दोन दिवस त्याच्याजवळ खूप पैसे खेळत होते. झडतींतही त्याच्याजवळ खूप पैसे मिळाले. हे इतके पैसे त्याच्याजवळ कोठून आले ? पोलिसांचा संशय बळावला. शिवाय रॉबर्ट हा एकेकाळी गुन्हेगार म्हणून प्रसिद्ध होता. ह्यामुळें तर पोलिसांचा संशय आणखी बळावला. हॉलला पोलिसांनीं आपल्या ताब्यांत घेतला. प्रथम त्यानें ' आपला कांहीं ह्यांत हात नाहीं ' म्हणून कानावर हात ठेवले. पण नंतर तो कबूल झाला कीं रकमेमधील १५०० रुपयांचा ऐवज आपल्याला मिळाला म्हणून. ' पण पळविणाऱ्या टोळींत मी नव्हतों.

' मग कोण होतें ?' पोलिसांनीं दरडावून विचारलें.

' बिल नांवाचा एक माणूस माझ्याजवळ आला व त्यानें हा सगळा ' प्लॅन ' रचला. '

पोलिसांनीं बिलला शोधून काढला. तो अट्टल गुन्हेगार विल्यम्स् इव्हान्स निघाला. त्याचा दररोजचा खर्च २०० ते ३०० रुपयांच्या घरांत असे. त्यामुळें त्याला नेहमीं पैशांची चणचण भासे. बिलनें मग सगळी कबूली दिली. त्याच्या दोन साथीदारांनाही पकडण्यांत आलं. पहिल्या प्रथम ' बॉक्स ' घेऊन येणारा इसम ह्या तिघांपैकींच एक होता. बाथरूममध्यें जाण्याऐवजीं तो मागील दरवाज्यानें पुन्हां बाहेर आपल्या साथीदारांना येऊन मिळाला.

तिघेही आज तुरुंगांत खितपत पडले आहेत. रॉबर्टला तंबी देऊन सोडून देण्यांत आलं.

•••

**शुक :** प्रिये तूं अशी खिन्न कां ?

**शुकी :** नाथ, ह्या पोपटपंचीचा अगदीं कंटाळा आला आहे !

**शुक :** मग काय करूं म्हणजे तुझी कळी पुन्हां खुलेल ?

**शुकी :** तुमच्या एखाद्या अपूर्व पराक्रमाची कथा ऐकवा !

**शुक :** प्रिये, शुकमुनि सांगतात त्याप्रमाणें 'जो दुर्जन असतो तो स्वतःचे गुण गातो व इतरांचे दोष जाहीर करतो. इतरांच्या अंगी दोष आहेत हीच जणूं आपल्या गुणांची ग्वाही आहे असा त्यांचा आविर्भाव असतो...

**शुकी :** पुरे ! पुरे ! तुमचे ते शुकशुक तत्वज्ञान ! वसंत ऋतू मागें गेला, वर्षाही संपत आला. आतां आगामी ऋतूची नवलाई तरी सांगा.



**शुक :** प्रिये, ती मी सांगून तुला समजणार नाहीं, ती ऐकून कळणार नाहीं. ती प्रत्यक्ष पाहूनच खरी लज्जत येईल. पण त्यासाठीं धीर धरला पाहिजे **फक्त ऑक्टोबर दहापर्यंत.** कारण त्या दिवशीं प्रसिद्ध होणार... ! !

# दीपावली वार्षिक १९६३

वर्ष १९ वें

**८ पानांची सप्तरंगांतली अप्रतिम चित्रमालिकाः 'वसुंधरेचे स्तन्य उसळलें !'**

**आपल्या आवडत्या लेखकांचें उत्कृष्ट साहित्य. अगदीं नवीन पद्धतीचें टेक्निकलर मुखपृष्ठ. नव्या प्रयोगांची व १६ पानांत विखुरलेली अशीं धक्के-बुक्के व शिक्के देणारी दुरंगी विनोद चित्रें. याशिवाय हास्याचे चौफेर पटकार मारणाऱ्या वात्रटिका, शृंगारिका, विनोदमालिका, पानपूरकें, हास्यचित्रें इत्यादि...इत्यादि...**

- पृष्ठें २०० चे वर
- किं. रु. ३+१ र. पो.

**प्रकाशक: दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई-४**




—जेम्स कल्हर्ट

*दीपावलीच्या जानेवारी १९६३ अंकांत प्रसिद्ध झालेल्या. 'ध्रुव ढळला' या धाडसी सत्यकथेचा पुढील भाग कांहीं अपरिहार्य कारणामुळें देता आला नाहीं. या अंकापासून ही सत्यकथा पुन्हा क्रमश: सुरू करीत आहोंत.*

**ॲडमीरल** रिकोव्हर यांच्याविषयीं मला जास्त आदर वाटण्याचें कारण म्हणजे मानसिक व बौद्धिक गोष्टींवरील त्यांची अविचल भक्ति. त्यांच्या ज्ञानाची व्याप्ति आणि आवड अफाट आहे. योग्य माणसांचा शोध घेण्यासाठीं त्यांनीं हजारों लोकांच्या चांचण्या घेतल्या आहेत, त्यांच्या शिक्षणावर विशेष भर दिला आहे. त्याशिवाय आपल्या हाताखालील लोकांना त्यांनीं वेळेचें महत्व पटवून देण्याचा प्रयत्न केलेला आहे. तसंच वेळेचा सदुपयोग करणं ( Spending of Time ) आणि वेळ नुसता घालवणं ( Killing of Time ) यांतील फरकाचं त्यांनीं ज्ञान करून दिलं आहे. माझ्याबरोबर तासचेतास त्यांनीं घालविले आहेत. त्यावेळीं त्यांनीं केवळ तांत्रिक चर्चा केली असं नव्हे तर आपण ज्या संस्थेंत काम करतों त्या संस्थेच्या हिताच्या दृष्टीनें शेवटीं महत्वाचं आणि हिताचं काय हें समजावून सांगणारं आपलं तत्वज्ञानहि त्यांनीं मला ऐकवलेलं आहे.

आणखी एक गोष्ट म्हणजे ॲडमीरल रिकोव्हर हे भित्रे नाहींत. सत्तेसाठीं आरडाओरड आणि धडपड करणाऱ्या जगांत म्हणजे वॉशिंग्टनमध्यें त्यांनीं कोणालाच विशेष भीक घातली नाहीं. त्यांच्या खोलींत शेक्सपीअरचं एक वचन टांगलेलं आहे:

'आपल्या मनांतले संशय हेच आपले शत्रू त्यांच्यामुळेंच आपण नुसता प्रयत्नहि करायला घाबरतो आणि अशा प्रयत्नांतून होण्यासारख्या लाभांना आचवतो.

पुन्हां पुन्हां प्रयत्न करायला ते कधीं कचरले नाहींत.

अगदीं ऊनोक्तीनें बोलायचें, तर आपल्या हाताखालीं काम करणाऱ्या माणसांचे नसतें लाड ॲड. रिकोव्हर कधींच करीत नाहींत. मी जेव्हां कामावर हजर झालों तेव्हां प्रथम गणिताची उजळणी, नंतर प्राथमिक अणु-भौतिकी आणि नंतर अनुशक्तीच्या माहितीसाठीं आवश्यक असलेले इतर तांत्रिक शिक्षण यांचा मला अभ्यास करावा लागला.

'नॉटिलस'चे कप्तान कमांडर युजेन विल्किनसन हे अधून मधून माझ्या ऑफीसमध्यें डोकावून माझं कसं काय चाललं आहे हें पाहून जात. 'डेनिस' विल्किन्सन हे एक दणकट, गडद रंगाचे आणि तरतरीत गृहस्थ आहेत. ते जें जें काम करतात त्यांत त्यांचा उत्साह व अमाप कार्यशक्ति दृग्गोचर होत असते.

१९५५ मध्यें त्यांचं माझं संभाषण झालं आणि तोच माझ्या आयुष्यांतील महत्त्वाचा क्षण ठरला. आम्हीं डेनिसच्या आवडत्या विषयांपैकीं एका विषयीं—आर्टिक महासागराविषयीं बोलत होतों. पुढें झुकून ते म्हणाले, 'जगांत महासागर असे फक्त चार आहेत. आणि सगळ्यांत जास्त महत्वाच्या ठिकाणी आर्टिक महासागर आहे. तो कुठें आहे तें पहा.' माझ्या टेबलावरील नकाशाकडे बोट दाखवीत ते म्हणाले.

मला हें चांगलं माहीत होतं. जगाच्या दोन प्रमुख प्रदेशांमध्यें ( Heart lands ) आर्टिक महासागर आहे. खरं बोलायचं म्हणजे साऱ्या जगाच्या भवितव्याची एक कळ या ठिकाणीं आहे.

'फार अवाढव्य आहे तो' डेनिस म्हणाले. 'भूमध्य समुद्राच्या पांचपट आणि अमेरिकेच्या साधारण दुप्पट आहे तो.'

'पण बर्फाचं कसं काय ?' मी विचारलं. नौदलांच्या हालचाली त्यामुळें जवळजवळ अशक्यच होत असतील.'

'त्या दृष्टीनें आम्ही कांहीं चांगली पाहणी केली आहे. या प्रदेशांत सर्वसाधारण बर्फाची जाडी दहा फूट असते—अर्थात् सरासरीने.' सरासरी शब्दावर जोर देत ते म्हणाले.

तें जर खरं असेल तर तिथें पाण्याखालीं प्रवास करतांना फारसा त्रास होणार नाहीं असं मला वाटलं. डेनिस म्हणाले कीं आर्टिकमधील हें पाण्याचं बर्फ सपाट शिळांच्या स्वरूपांत असतं. या शिळा एकमेकांवर खूप जोरानें आदळतात आणि त्यामुळें बर्फाच्या थरावर आणि खालच्या बाजूला बर्फाचे मोठाले उंचवटे व टेकड्या तयार होतात.

'बर्फाच्या या टेकड्या पाण्याच्या खालीं कितपत खोलवर गेलेल्या असतात ?' मी विचारलं.

'तशा फार नाहींत—बहुधा शंभर फुटाहून जास्त नाहीं. आपण त्याच्या खालून अगदीं आनंदानें जाऊं शकूं' डेनिस म्हणाले.

नॉटिलस पाणबुडी आर्टिक महासागरांत बर्फाखालून, बहुधा उत्तर ध्रुवापर्यंत न्यायचं त्यांच्या मनांत असावं, हें उघड दिसत होतं.

"ही कल्पना आहे जरा धाडशीच.' डोकं हालवीत मी डेनिसना म्हणलों.

डेनिसनीं एक छोटी खुर्ची घेतली व तिच्यावर उलट बसत त्यांनीं आपली हनुवटी खुर्चीच्या पाठीवर टेकली व माझ्याकडे ते गंभीर चेहऱ्यानें पाहूं लागले.

'जीम ऐक. मी सांगितली ती कांहीं संपूर्ण नवी कल्पना नव्हे. निदान पंचवीस वर्षांपूर्वी सर ह्यूबर्ट विल्किन्सन हे आरमारांतीलच एक पाणबुडी आपल्याला हवीतशी बदलून तिच्यांतून तिकडे गेले होते. जहाज निकामी झालं म्हणून त्यांना अर्ध्यावरून परतावं लागलं. आठवतं ना ?'

मला अंधुकशी आठवण होती. 'त्यांना एकंदरींत फार त्रास झाला. नाहीं का ?'

'पण त्यानंतर परिस्थितींत पुष्कळच फरक झाला आहे.' डेनीस मनःपूर्वक म्हणाले.

ते पुढें म्हणाले, 'एक तरुण शास्त्रज्ञ वॉल्डो लायन यांच्या सतत पाठपुराव्यानें अमेरिकन नौदल या विषयांत लक्ष घालूं लागलं. १९४६–४७ सालीं ॲडमीरल बर्ड अंटार्टिक महासागरांत संशोधन करायला गेले त्यावेळीं आरमारानें त्यांच्याबरोबर एक पाणबुडी पाठवावी असा लकडा त्यांनीं लावला व त्यांत यश मिळविलं. या आणि त्यानंतरच्या सफरींत लायन यानीं एक यंत्र तयार केलं. त्या यंत्रामुळें बर्फाच्या किती खालवर पाणबुडी आहे एवढंच कळत होतं असं नव्हे तर प्रत्यक्ष तें बर्फ किती जाडीचं आहे हेंहि कळूं लागलं.'

पण डॉ. लायन यांचं पाणबुडीच्या सहाय्यानें ऑर्टिक महासागर जिंकण्याचं स्वप्न कधीं साकार होईल असं वाटत नव्हतं. साधी डिझेल-इलेक्ट्रिक पाणबुडी पाण्याखालीं फारतर तीस तास राहूं शकते आणि ती सुद्धां जर त्याची गती तासाला फक्त तीन नॉट असली तरच. याचा अर्थ त्या सरकत्या बर्फांत निदान दर ९० मैलांवर एकतरी उघडं तळं हवं कीं जिथें पृष्ठभागावर बर्फ नसेल व पाणबुडी वर येण्यास उघडी भरपूर जागा असेल.

प्रयत्न केल्यावर निदान उन्हाळ्यांत अशीं तळीं मिळणं अगदींच अशक्य नव्हतं. पण जर का तसं तळं ९० मैलांच्या अंतरांत मिळण्याच्या प्रयत्नांत अपयश आलं तर त्याची शिक्षा म्हणजे मृत्यु. आणि म्हणूनच कुणीहि शहाणा कमांडर आपला काफिला घेऊन अशा सफरीवर मृत्यूस भेटायला जाण्याच्या कागदावर सही करण्याचा जुगार खेळणार नाहीं.

ऑक्सीजन फार मोठ्या प्रमाणावर खाणारीं डिझेल इंजिनं पाण्याच्या पृष्ठभागावरून चालण्यासाठीं आणि अल्पकाळांत संपणाऱ्या विजेच्या बॅटऱ्यांवर चालणारीं विजेचीं इंजिनं सागराच्या पोटांतून चालण्यासाठीं इतका सरंजाम साध्या पाणबुडीसाठीं आवश्यक असतो. उलट अणुपाणबुडीला प्राणवायु लागतो तो फक्त खलाशाच्या श्वासोच्छ्वासापुरता. शिवाय अणु इंधनाचा पुरवठा अखंड चालणारा असल्यामुळें पाण्याखालीं जरूर तेवढा काळ—म्हणजेच 'वर' येण्यासाठीं बर्फाच्या थरांत एखादें पाण्याचें 'तळें' सापडेपर्यंत समुद्राच्या पोटांत राहणें अणु पाणबुडीला सहज शक्य असतें.

पण जेव्हां अणु संचालित नॉटलिस समुद्रांत उतरली तेव्हां ताबडतोब डॉ. लायन यांच्या ध्यानीं आलं कीं आपल्या योजनेला अगदीं साजेशी पाणबुडी तयार झाली आहे.

लगेच डॉ. लायन यांनीं नॉटिलसच्या कप्तानाला गांठून त्यांच्याशीं चर्चा सुरू केली. कप्तान डेनिस विल्किनसन लवकरच ध्रुव प्रदेशांत सफर करण्यास अनुकूल झाले. इतकंच नव्हे तर उत्साहानें या कल्पनेचा प्रचार करूं लागले.

बर्फाच्या थराखालून नॉटिलस न्यायची, ही कल्पना इतरांना पटवून देण्याचें कार्य त्यांनीं नेहमीच्या धडाडीनें सुरूं केलें. १९५५ च्या उन्हाळ्यांतल्या त्या संध्याकाळीं त्यांनीं माझा निरोप घेतला तेव्हां त्यांना आणखी एक अनुयायी मिळाला होता. नॉटिलसनें बर्फाखालून ध्रुवापर्यंत गेलें पाहिजे असें तर माझें ठाम मत झालें होतेंच पण आपण स्वतः त्या सफरींत सामील व्हावें, असेंहि मला तीव्रतेनें वाटूं लागलें होतें.

माझ्या या वाढत्या उत्सुकतेनें मी आर्टिकवरील ग्रंथ वाचावयास सुरुवात केली आणि माझ्या वाचनानें लौकरच माझी फ्रि त्यॉफ नानसेन्शीं जानपछान करून दिली.

१८७९ मध्यें बेअरिंगच्या सामुद्रधुनींतून उत्तर ध्रुवावर जाण्यासाठीं निघालेल्या, शिडें व वाफेवर चालणाऱ्या 'जेनेट' या अमेरिकन जहाजाची दुर्दैवी कहाणी, नान्सेन् या नार्वेजिअन गृहस्थानें वाचली होती. अपेक्षित जागेच्या फारच अलिकडे जेनेट बर्फांत अडकली. जवळजवळ दोन वर्षेपर्यंत ती बर्फाबरोबर वहात जात होती. तिच्यावर सतत आदळणाऱ्या बर्फाच्या शिळांमुळें नंतर तिचा चुराडा झाला.

जॉर्ज वॉशिंग्टन डी लॉन यांच्या हुकमतीखालील त्या तेहतीस अधिकाऱ्यांनीं–खलाशांनीं तिथून शंभर मैल नैऋत्येकडे, बर्फावरून तीन जड लाकडी होड्या ओढीत अत्यंत कष्टमय असा प्रवास केला. शेवटीं त्यांनीं कशाबशा आपल्या होड्या उघडीक असलेल्या पाण्यांत घातल्या व तरंगत्या बर्फशिळांमधून वाट काढीत कसेबसे बिनबर्फाच्या समुद्रापर्यंत येऊन पोचले.. तिथून सैबेरिया चारशें मैल दूर होता. तिथें जाईपर्यंत त्यांच्या होड्या एकमेकींपासून दूरदूर झाल्या. त्यांतील दहा माणसं असलेली एक होडी नाहींशींच झाली. डॉ. लॉंग आंत असलेली होडी लेना नदीपर्यंत येऊन पोचली. पण डॉ. लॉंग आणि त्यांच्या होडींत सुरवातीला असलेल्या तेरा प्रवाशांपैकीं अकरा लोक एखादें खेडें लागण्यापूर्वींच मरण पावले.

नान्सेनच्या कल्पनाशक्तीला या दुःखद घटनेंतील कांहीं तपशीलानीं चालना दिली. जेनेट हें जहाज सैबेरियाच्या उत्तरेला आर्टिक महासागरांत








१८८१ मध्यें बुडालं पण १८८४ मध्यें दोन हजार मैल दूर असलेल्या ग्रीनलंडनच्या किनाऱ्यावर बर्फाबरोबर वहात वहात गेले त्या जहाजाचे कांहीं अवशेष सांपडले, यावरून नान्सेननें असा निष्कर्ष काढला कीं सैबेरियाकडून निघणाऱ्या समुद्रांतर्गत जलप्रवाहानें बर्फ-शिळांबरोबर हे अवशेषहि आर्टिक महासागरांतून ढकलीत ढकलीत आणले, आणि ग्रीनलंड स्पिटस्बर्जन सामुद्रधुनींतून अटलांटिक महासागरामध्यें ढकलून दिले.

उत्तर ध्रुवावर जाण्याचा हाच मार्ग असें नान्सेननें मनाशीं ठरविलें. बर्फशिळांच्या जोरानें मोडलें जाणार नाहीं असं बळकट जहाज जर आपणाला बांधतां आलं तर तें सैबेरियाजवळ नेऊन बर्फामध्यें सोडलं तर त्या समुद्रांतर्गत प्रवाहाबरोबर ढकलत ढकलत अटलांटिक-पर्यंत येईल असा त्यानें कयास केला.

आणि १८९३ मध्यें त्यानें फ्रॅम हें छोटं, बळकट जहाज पाण्यांत सोडलं. त्याच्या नावेच्या वाटोळ्या आकारामुळें बर्फाच्या शिळा तिचा चुराडा करण्याऐवजीं जहाज पुढेंच ढकलीत व त्याचा नाश टळेल अशी युक्तीहि त्यानें केली.

त्या उन्हाळ्यांत त्यानें नावेंतून समुद्रांत जहाज लोटलं व रशियाच्या उत्तर किनाऱ्याच्या बाजूनें त्यानें प्रवास केला; आणि न्यू सैबेरियन आयलंडच्या उत्तरेस बर्फामध्यें प्रवेश केला. तीन वर्षेंपर्यंत तें जहाज नान्सेनच्या कल्पने-प्रमाणेंच पुढें पुढें सरकत होतं. १८९६ च्या वसंत ऋतूंत तें जहाज स्पिठस्बर्गन येथून बर्फापासून मुक्त झालें व थोड्याच दिवसांत नॉर्वेमध्यें परत आलं.



सूत्रधार

आर्टिकविषयीं आज आम्हांला जी माहिती आहे ती नान्सेनमुळेंच. समुद्राच्या पृष्ठभागावर तरंगणारं बर्फ हें साधारणतः १०–१२ फूट जाडीचं असावं हा आपला अंदाज खरा असल्याची त्यांनीं खात्री करून घेतली. पाण्याची खोली मोजण्याचीं साधनं त्यानं मोजमांप घेतलीं तेव्हां आढळलं कीं ध्रुवाकडील सागरी प्रदेश हा फार खोल आहे. कित्येक ठिकाणीं तो दोन मैलांपेक्षांहि खोल आहे. त्यांनीं हेंहि सिद्ध केलं कीं तिथलं उन्हाळ्यांतील उष्णतामान ३२ डिग्री फॅरेनहाइट असतं व हिवाळ्यांत शून्य बिंदूच्या खालीं ३२ डिग्री फॅरेनहाइट इतकं उतरतं. त्यांनीं तेथील अस्वलं, सील, मासे, कोल्हे वगैरे तिथें कायमचं बसतीस्थान करणाऱ्या प्राण्यांची माहिती प्रत्यक्ष पाहून काळजीपूर्वक लिहून ठेवली. नान्सेनची माहिती अचूक होती—वास्तुनिष्ठ होती. त्याच्या कल्पना फार भव्य होत्या. त्याच्यासारखीं माणसं आर्टिक प्रश्नास तनमन--धनेंकरून वाहून घेतात हें पाहिल्यावर मला वाटूं लागलं कीं अशा संशोधकांनीं मिळवलेला ज्ञानाचा साठा वाढवण्यासाठीं आपण आपल्याला शक्य तें सारं कांहीं केलंच पाहिजे.

## : ३ :

पृथ्वीच्या उत्तर टोकाची बर्फमय सरहद्द गाठून तिची पाहणी करावी ही माझी उत्कट इच्छा प्रत्यक्षांत येण्याची संधी मला तीन वर्षांनीं मिळाली. मी कमांडर रिकोव्हर यांच्या हाताखालीं दोन वर्षं शिक्षण घेतलं व मेहनत केली, त्याचं बक्षीस म्हणून मला यू. एस्. एस्. स्केट या पाणबुडीचा कप्तान बनविण्यांत आलं. स्केट ही आमच्या देशांतील अणुशक्तीवर चालणारी तिसरी नौका. ('नॉटिलस' नंतर 'सी वुल्फ'नेंहि १९५५ मध्यें समुद्र प्रवेश केला होता.) आतां १९५८, मध्यें आम्हीं गोंठलेल्या उत्तरेच्या मार्गानें प्रत्यक्ष प्रवासास चाललों आहोंत.

आम्ही न्यू लंडन येथें किनारा सोडला आणि संथ टेम्स नदींतून दर्याकडे चाललों. जुलैमधील एका उबदार, चांदण्या रात्रीं कांहीं मिनिटांच्या आंत आम्हीं लॉंग आयलंड साउंडच्या काळ्याभोर पाण्यांतून मार्ग कापूं लागलों.

पण आमच्या प्रयाणकालची ही शांतता वरवरची होती. कारण जहाजा-मधें वातावरण तंग होतें. औत्सुक्यपूर्ण होतें. जहाजावर काम करणारीं सारीं सत्याण्णव माणसें अधिक नऊ 'पाहुणे' नागरी तज्ञ हे सर्व पुढील प्रवासाविषयीं तर्क वितर्क करण्यांत गर्क होते. मी अद्याप माझे सर्व हुकूम जाहीर केले नव्हते. तरी प्रत्येकाला ते काय असतील याची सर्वसाधारण कल्पना होती. तेवढं पुरसं होतं.

कनेक्टिकर किनारा मागें टाकला तेव्हां डेक ऑफिसर लेफ्टनंट डेव्ह बॉयड्‌बरोबर मी कप्तानाच्या चौकीवर ब्रीजवर जाऊन उभा राहिलों. डेव्ह हा तांबुस पिवळ्या केसांचा कणखर बांध्याचा आणि कामाचा अतिशय उरक असलेला विश्वासू आणि पाणबुडीच्या कप्तानाला हवासा वाटेल असा कर्तृत्ववान स्कॉट आहे. स्केट मोठाल्या महासागरी लाटांमधून घुसूं लागली होती आणि आम्ही दोघे न बोलतां ब्रिजवर उभे होतों. शांततेचा भंग केला तो ध्वनिक्षेपकानें. सागराच्या पृष्ठावर कांहींतरी समोरून येत असल्याचें राडार यंत्रावरून दिसत असल्याचें राडार अधिकारी सांगत होता.

क्षितिजावर आमच्या दिशेनं येत असलेल्या एका व्यापारी जहाजाचे दिवे लुकलुकत होते. तें आमच्यापासून सहा मैलांहून जास्त दूर होतं. राडारनें सांगितलं कीं आम्ही त्या जहाजापासून दोन मैलांपेक्षां अधिक जवळ जाणार नाहीं. डेव्हनें दुर्बिणींतून त्या लुकलुकत्या दिव्यांची काळजीपूर्वक पाहणी केली व मग तो हेल्म्समनला मायक्रो-फोनवर म्हणाला, 'डावीकडे–ये--शून्य-नऊ–पांच'. आमची पाणबुडी डावीकडे वळली व त्या व्यापारी जहाजाला जायला भरपूर जागा मोकळी करून दिली.

अनुक्रमणिका

दुसऱ्या जहाजाला धडक बसूं नये याबाबत पाणबुडीला अत्यंत दक्षता घ्यावी लागते. कारण पाणबुडीच्या बगलेला अगदीं किंचितशीहि चीर पडली तरी पाणबुडी आणि वरील सर्व खलाशी यांना सरळ जलसमाधी मिळणार. आपणाकडे येणारी एखादी वस्तू अगर आपण ज्याच्या जवळ जाऊं अशी एखादी गोष्ट यांच्यामध्यें व आपल्या पाणबुडीमध्यें नेहमींच भरपूर अंतर ठेवलं जातं. तरीहि माझ्या मनांत विचार आला कीं या शांत आणि आल्हादक रात्रीं आर्टिक महासागरावर जात असतां आम्हाला अगदीं उलट्या परिस्थितीला तोंड द्यावं लागणार आहे. समुद्राच्या पृष्ठभागावर बर्फ असलेल्या प्रदेशांतसुद्धां जिथें जिथें बर्फविहीन मोकळी जागा असेल व 'स्केट' वर आणण्याची शक्यता असेल तिथें 'स्केट' वर आणण्याचा मला आदेश होता. वाटेंत येणाऱ्या अडथळ्यांना चार हात दूर ठेवण्याऐवजीं त्या अडथळ्यांना जाऊन चिकटण्याची संवय करणं भाग होतं. 'स्केट' ज्या दिशेनं चालली होती, तिथं तिला वाटेंत जहाजं फारच थोडीं भेटणार होतीं. पण जहाजांहूनहि फार मोठा असा धोक्याचा अडथळा तिला भेटणार होता, आणि तो म्हणजे बर्फ. आमची सुरक्षितता मैलांनीं मोजण्याऐवजीं ती फुटांनीं मोजण्याचा प्रसंग येणार होता.

यापूर्वी आम्ही दाखविली ह्यापेक्षां जास्त दक्षता, जास्त काटेकोर निर्णय यांची आतां आवश्यकता होती. आम्ही योग्य तें शिकून आमची पात्रता सिद्ध करून यशस्वी होऊन परत येऊं का? आतां आम्ही आगेकूच तर करीत होतोंच पण निघण्यापूर्वी मला जी खात्री होती ती आतां किंचित् कमी झाली होती.

ब्रीजवरून मी खालीं जायचें ठरविलं व डेव्हला ३० फॅदम पोचल्यावर पाणबुडी पाण्याखालीं नेण्याचा हुकूम द्यायचं ठरविलं. त्यावेळीं आम्ही 'नान्टुकेट' दीपनौकेच्या रोखानें चाललेले असूं. ही दीपनौका म्हणजे अमेरिकेकडून उत्तरेकडे जातानांचा अखेरचा भयसूचक दिवा.

मी खालच्या ब्रीजवर उतरलों. तिथें बँकेच्या व्हॉल्टला असतो तसा भक्कम पाणीबंद झरोका होता. तिथनं जहाजांत जायचा मार्ग होता. तो झरोका म्हणजे माझ्या दृष्टीनं सर्व जगापासून दूर असलेलं आणि तरीहि स्वयंपूर्ण असलेलं पाणबुडीचं खाजगी विश्व याचं प्रतीक होय. खालच्या ब्रीजच्या बाहेर पहावयाच्या खिडक्यांमधून पाहिल्यावर शांत, स्तब्ध आणि चांदण्यांत न्हाऊन निघालेला अॅटलांटिक दिसत होता.

त्या दरवाजांतून मी पलिकडे गेलों व एका मोठ्या शिडीवरून खालीं उतरलों व नियंत्रणालयांत गेलों. तिथल्या काळोखात पहाऱ्यावर असलेल्या माणसांच्या अस्पष्ट आकृति दृग्गोचर होत होत्या. रात्रीं या खोलींत थोडासा तांबडा उजेड ठेवण्यात येतो. कारण लख्ख प्रकाशांत काम करतां करतां ब्रीजवर जाणारांना रात्रीच्या अंधारांत समुद्रावरील गोष्टी दिसणें कठीण पडतें. पेरिस्कोपच्या दोन नळकांडीं त्या चमत्कारिक उजेडात विचित्रपणें चकाकत होतीं. सुकाणूवाला आपल्या जागीं उभा आहे हें कळत होतें तें त्याच्या तोंडांतल्या जळत्या सिगारेटमुळें. त्याच्या पुढ्यांतल्या दिशा-दर्शकाच्या लाल प्रकाशात तो जहाज हाकारीत होता. थोड्याशा अंतरावर एक राडारमन बसला होता. हिरव्या उजेडानें प्रकाशित झालेली एक काचेची पाटी त्याच्या समोर होती. त्या पाटीवरील एक हालता-चकाकता ठिपका तो न्याहळत होता. आमच्या दक्षिणेकडून जाणारं तें व्यापारी जहाज होतं.

पाणबुडीच्या वरचा खुल्या हवेंतला तो ब्रीज आणि हें पूर्णपणें मानवनिर्मित असं पाणबुडीच्या आंतलं वातावरण या दोहोंतला फरक मला जाणवल्याशिवाय राहिला नाहीं. आपण कुठं जात आहोंत तें दिसत नसूनहि इथलीं माणसं जहाज हाकारीत होतीं. आणि कधींच न दिसणाऱ्या इतर जहाजांची दिशा व अंतर याविषयीं खात्रीपूर्वक बोलत होती. काहीं आठवडे, कदाचित् कांहीं महिने आम्हांला समुद्राच्या या प्रचंड रिकामेपणाच्या विश्वासावर तसेंच इलेक्ट्रॉनिक उपकरणांच्या काना-डोळ्यांवर अवलंबून रहावं लागणार आहे. पुढें जाणाऱ्या मार्गावर मी काळोखांत पाऊल टाकलं व उजेडाच्या मदतीपेक्षां अंतर्मनाच्या प्रेरणेने कॅप्टनच्या केबिनमध्यें येऊन बसलों.

केबिनमध्यें एक कॉट, एक बुक केस, एक छोटं डेस्क, एक खुर्ची, बुलमन पद्धतीनें घडी करून भिंतींत जाणारं वॉशबेसिन, एक छोटा क्लोसेट, जहाजाच्या आंतल्या आंत उपयोग करण्याचा टेलिफोन, भिंतीवर पाणबुडीचा मार्ग व पाण्याची खोली नोंदणारे इंडिकेटर्स एवढंच फर्निचर. खोलीचा व आंतील फर्निचरचा फिकट हिरवा रंग, आंत मोकळेपणा व भरपूर जागा असल्याचा फक्त आभासच निर्माण करीत होता व ही साधीसुधी खोली ख्यालीखुशालीची वाटत होती, ती एका गोष्टीमुळें. पाणबुडीवर कॅप्टनची खोली ही एकच अशी जागा आहे कीं जिथें खासगीपणा असतो. 'ट्रिगर' पाणबुडीवर मी प्रथमच कॅप्टन होतों. तेव्हां कॅप्टनच्या खोलीचा हा 'एकांत' मला पुष्कळ दिवसपर्यंत कसासाच वाटे.

डेक अधिकाऱ्यानें रात्रौ काय करायचं याचे हुकूम मी डेस्कवर लिहून ठेवले. ती 'छोटी' चामड्याचं कव्हर असलेली चोपडी मी कंट्रोल सेंटरवर पाठवून दिली. पायजमा चढवला व झोपीं गेलों.

थोड्याच वेळांत पाणबुडीं पाण्यांत बुडी मारतांना वाजणाऱ्या भोंग्याच्या आवाजानें मी जागा झालों. स्केटनें तोंड खालीं वळवलं होतं. डेव्हनें तिला अतिशय अलगतपणें पाण्यांत नेली. अलगतपणें एवढ्याचसाठीं कीं अजूनहि पाणी उथळ होतं. पाण्यांत जरा खाली जाऊन पाणबुडी पाण्याच्या पृष्ठभागाशीं समांतर झाली आणि तिनें वेग घेतला हें मला पडल्याजागीं जाणवलें. तिनं हळूंहळूं गती घेतली. पाणबुडीनं गती घेतली कीं ती एखाद्या जिवंत प्राण्यासारखी भासूं लागते.

आपला प्रवास सुरू झाला या जाणिवेनें मला समाधान वाटलं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं माझ्या नेहमीच्या सरावाप्रमाणें मी जहाजावर या टोकापासून त्या टोकापर्यंत चक्कर मारली. या अशा फिरण्यानें मला साऱ्या बारीक सारीक गोष्टी कळतात. आमचं साहित्य आणि साधनं यांची स्थिति कशी आहे, कोणते छोटे नवे प्रश्न उपस्थित झाले आहेत, आणि (सर्वांत महत्वाचं म्हणजे) खलाशांची मनःस्थिती कशी आहे.

अणुचलित पाणबुडीमधून समुद्रावर सफर करणं कसं काय असतं असं मला पुष्कळांनीं विचारलं आहे. त्यानां सांगण्यासारखं पुष्कळ आहे. इतर जहाजांनीं प्रवास करणं आणि या पाणबुडींतून प्रवास करणं यांतील महत्वाचा फरक म्हणजे या जहाजाचा प्रवास हा समुद्राच्या पृष्ठभागावरून न होतां, समुद्राच्या पोटांतून होतो. क्रमशः

अनुवादक : श्रीकृष्ण ठाकूर






# जय नांवाचा इतिहास आणि ही वाचकांची प्रतिक्रिया



**दीपावलीचे** एकनिष्ठ लेखक आत्माराम नीलकंठ यांची 'जय नांवाचा इतिहास' ही लेखमाला दीपावलींतून प्रसिद्ध होत असतांना अनेकांनीं या लेखमालेच्या लेखकाचा परिचय करून देण्याबद्दल पत्ररूपानें विनंति केली, त्याचप्रमाणें आम्हीं विनंति केल्याप्रमाणें आपलीं स्पष्ट मतेंहि आमच्याकडे पाठविली. तीं मतें खालीं प्रसिद्ध करीत असतांना आत्माराम नीलकंठ यांचा थोडासा परिचय करून देत आहोंत. त्यांचें संपूर्ण नांव—

श्री. आत्माराम नीलकंठ साधले. जन्म ५–७–१९२०. मूळ गांव सावंतवाडी. वडिलार्जित व्यवसाय भिक्षुकीचा. या व्यवसायांत धर्मभोळया भाविकांचीं आपणाकडून फसवणूक तर होत नाहींना–अशा कल्पनेनें व्यवसायाचा त्याग करून माधुकरी मागून त्यांनीं आपलें बी. ए. पर्यंत शिक्षण पुरें केलें.

कविता, कथा इत्यादि ललित साहित्य प्रकार आनंद साधले या नांवानें त्यांनीं पंचविशींत खूप लिहिलें. पुढें रामायणादि ग्रंथांच्या अभ्यास प्रारंभ केला. राम हा केवळ एक प्रयत्नशील माणूस होता अशा दृष्टिकोनांतून त्यांनीं तीस हजार काव्यपंक्तींचें रामायण लिहून पूर्ण केलेलें आहे. सध्यां काव्यमय महाभारताची रचना चालू आहे. साधले डोळस व्यासंगी आहेत. पुराणांतील कांहीं भाकडकथा सत्याच्या निकषावर तोलून त्यांतील सच्चा अर्थ लावण्यांत ते ज्या तऱ्हेनें कष्ट घेत आहेत, ते कष्ट पाहिले म्हणजे साधल्यांबद्दलचा आदर दुणावतो. 'हा जय नांवाचा इतिहास' या लेखमालेंत दिसलेली साधल्यांची चिकित्सक व्यासंगी बुद्धि अनेकांना आकृष्ट करूं शकली ती त्यांच्यांतील प्रामाणिक भावनेमुळेंच. संस्कृत साहित्याचाहि साधल्यांना बराच व्यासंग आहे. साधल्यांची महाभारतावरील नवविचारी काव्यरचना पुरी होवो आणि त्यांचा इष्टदेव त्यांना प्रसन्न होवो अशी ह्या प्रसंगीं इच्छा व्यक्त करतो.

**श्री. अनिलकुमार खुर्शीकर**
**आपले विचार**
**मांडतांना म्हणतात...**

## सौती

'**जय**' हा इतिहास आहे आणि सौतीनें अनेक भारूडांची भर घालून त्यावर मोठा अन्यायच केला आहे.'' या लेखकाच्या विधानाशीं मी पूर्णपणें सहमत आहे. मात्र त्यासाठीं लेखकानें दिलेलीं कारणें मात्र मला पटत नाहींत. मी असें म्हणतो तें अगदीं वेगळ्या कारणांमुळें.

जर 'जय' हा इतिहास मानला तर दोन जीवननिष्ठा हा त्याचा प्रतिपाद्य विषय असूंच शकणार नाहीं. सत्यप्रतिपादन हाच इतिहासाचा खरा हेतु. या दोन जीवननिष्ठा सौतीमुळें महाभारतांत आल्या अशांतलाहि कांहीं भाग नाहीं. कारण मूळच्या 'जय' या ग्रंथांत युधिष्ठिराचें चित्र महाभारतांतल्या चित्रापेक्षां अगदीं वेगळें असणें अशक्यच आहे, तेव्हां या दोन जीवननिष्ठांचें चित्रण इतिहासकथनाबरोबर आपोआपच झालें असावें. त्याबद्दल सौतीला दोष देतां येणार नाहीं.

या दोन जीवननिष्ठांच्या प्रतिपादनामुळें वाचक गोंधळांत पडतो हें म्हणणेंहि तितकेंसें बरोबर वाटत नाहीं. कारण एक तर असा एखादा ग्रंथ वाचून कुणाला जीवनांत कसें वागावें याचे धडे कधींच घेतां येणार नाहींत. सरतेशेवटीं स्वतःच्या सारासार विवेकबुद्धीवरच प्रत्येकाला अवलंबून राहिलें पाहिजे. आणि दुसरी गोष्ट अशी का महाभारताकडे सामान्य वाचक 'जीवनांत कसें वागावें हें सांगणारा ग्रंथ' म्हणून पहात नाहीं. कुठलाहि ग्रंथ असें तत्त्वज्ञान सांगायला अपुरा आणि असमर्थ ठरेल.

मग सौतीच्या या नसत्या खटाटोपामुळें महाभारतावर कोणता अन्याय झाला ! माझ्या मतानें सौतीनें आपला दोन प्रकारें तोटा केला.

'प्राचीन भारताचा इतिहास' या दृष्टीनें मूळ 'जय' ग्रंथास जें महत्त्व मिळालें असतें तें आज महाभारताला मिळूं शकत नाहीं. आणि कधींच मिळणार नाहीं. सौतीच्या कृत्यामुळें आपला एक प्राचीन इतिहासग्रंथ पार लोप पावला आहे. हा फार मोठा तोटा झाला आहे.

दुसरा तोटा हा कांहींसा अप्रत्यक्ष स्वरूपाचा आहे. आपल्याकडे कधीं इतिहास लिहून ठेवण्याची पद्धतीच नव्हती. जर 'जय' हा ग्रंथ इतिहास याच स्वरूपांत राहता तर कदाचित् त्यानंतर इतरहि कांहीं लोकांनीं त्यासांचें अनुकरण करून त्या धर्तीवर आणखी कांहीं इतिहास ग्रंथ लिहिले असते, आणि आज आपल्याला प्राचीन भारताचा इतिहास






उपलब्ध झाला असता. परंतु सौतीच्या उद्योगामुळें 'जय' 'महाभारत' बनलें, इतिहास-ग्रंथ हें त्याचें महत्त्व उरलें नाहीं व त्यामुळें ही शक्यता नष्ट झाली.

सौतीनें जयावर आणि पर्यायानें भारतीयांवर अन्याय केला तो या प्रकारें.

युधिष्ठिरावर लेखकानें अन्याय केला आहे, फार मोठा अन्याय केला आहे. ज्या एका प्रसंगाचा आधार घेऊन युधिष्ठिरावर अनेक आरोप केले जातात तो प्रसंग म्हणजे द्रौपदी-वस्त्रहरणाचा. खरे म्हणजे हा प्रसंग महाभारतांत जसा वर्णिला आहे तसा खरोखर घडला असणें शक्य वाटत नाहीं. तिथें तो अतिशयोक्तीनें सांगितला आहे. मात्र एवढें निश्चित कीं या प्रसंगीं द्रौपदीचा कांहींतरी घोर अपमान झाला, हा अपमान युधिष्ठिरामुळें झाला आणि युधिष्ठिरानें तो निमूटपणें सहन केला.

आपल्या धर्मपत्नीचा अपमान निमूटपणें सहन करणें हें वाईटच. परंतु येथें आपल्याला त्यावेळची परिस्थिति आणि त्यावेळीं युधिष्ठिरानें घेतलेली भूमिका लक्षांत घेऊनच आपलें मत बनवलें पाहिजे. कोणतेंहि कृत्य चांगलें कीं वाईट हें केवळ त्या कृत्यावरून ठरत नसून त्यावेळची परिस्थिति आणि तें कृत्य करण्यामागची कर्त्याची भावना यावरून तें ठरतें. द्रौपदीचा अपमान युधिष्ठिरानें निमूटपणें पाहिला हा युधिष्ठिराचा भ्याडपणा निश्चित नव्हे. 'आपण आतां खड्ग घेऊन उठलों तर दुर्योधन व त्याच्या पाठचे भाऊ आपल्याला ठार करतील; मग त्यापेक्षां आपण आपलें गप्पच बसूं या' असा विचार कांहीं युधिष्ठिराच्या मनांत आला नव्हता. युधिष्ठिराची निष्क्रियता सर्वस्वी त्याच्या धर्मप्रेमांतून उद्भवली आहे.

श्रीकृष्णानें शिशुपालाचा वध केला त्यावेळची परिस्थिति आणि युधिष्ठिरानें द्रौपदीचा अपमान सहन केला त्यावेळची परिस्थिति यांच्यांत महदंतर आहे. युधिष्ठिर हा स्वतःच्याच शब्दानें बांधला गेला आहे, श्रीकृष्णाची परिस्थिती वेगळी आहे. आणि महाभारताचाच आधार घेऊन असेंहि म्हणतां येईल कीं श्रीकृष्ण तरी शिशुपालाचे शंभर अपराध भरेपर्यंत थांबलाच कीं नाहीं ?

आज दुर्योधन आपल्या कुचाळक्या काढतो आणि आपण नाना वेदांत सांगून आपली पौरुषहीनता लपवतो यांत युधिष्ठिराचा दोष कोणता ? आणि समजा, युधिष्ठिरानें द्रौपदीचा अपमान सहन न करतां तिथल्या तिथें दुर्योधनाचें पारिपत्य केलें असतें, तर आजहि आपण तसेंच वागलों असतों या म्हणण्याला कोणता आधार ? खरी गोष्ट अशी आहे कीं सामान्य माणूस हा नेहमीच भ्याड असतो, दुर्योधनाला विरोध करण्याची त्याची ताकत नसते आणि स्वतःची दुर्बलता प्रकट करण्याचीहि त्याला शरम वाटत असते मग तो पुराणांतून, इतिहासांतून किंवा अन्य कुठूनतरी असे दाखले पुढें मांडतो. युधिष्ठिर तसा वागला म्हणून हा असा वागतो असें मुळींच नव्हे; युधिष्ठिर कसाहि वागो, हा असाच वागणार. युधिष्ठिराची निष्क्रियता उद्भवते त्याच्या धर्मप्रेमांतून, त्याच्या भ्याडपणांतून. कांहींना हें समजतच नाहीं; कांहींना समजतें, जाणवतें आणि तरीहि तें न समजल्यासारखें दाखवून तसेंच वागतात.

'युधिष्ठिर स्वर्गाचा नरक बनवील' हें विधानहि असेंच युधिष्ठिरावर अन्याय करणारें आहे. शेवटीं स्वर्ग आणि नरक हे बाह्य परिस्थितीप्रमाणें मानसिक स्थितिवरहि अवलंबून आहेत. एखाद्याचा 'दारिद्र्यांतच राहिलों तरी हरकत नाहीं, पण सचोटीनेंच वागेन' असा बाणा असतो, त्याला लबाडीच्या श्रीमंतींत चैन पडणार नाहीं. हें प्रत्येकाच्या मनोवृत्तीवर अवलंबून आहे. युधिष्ठिराची जी मनोवृत्ति आहे तिला असत्याचरण मान्य नाहीं.

युधिष्ठिराचा आदर्श या व्यावहारिक जगांत लाभदायक होत नसेल, पण म्हणून तो निंद्य ठरत नाहीं. युधिष्ठिराचा राग येत नाहीं, कींव येते, असा माणूस या पापी जगात कशाला असें वाटतें. दोष पापी जगाचा आहे, युधिष्ठिराचा नाहीं. आणि म्हणूनच युधिष्ठिर स्वर्गात गेला तर त्याचा नरक करील हें विधान पटत नाहीं. युधिष्ठिर कांहींच करणार नाहीं; हें पापी जगच युधिष्ठिराचा दुर्योधन करील आणि कधींतरी त्यालाहि 'नरो वा कुंजरो वा' असें म्हणायला लावील.





अनुक्रमणिका

## ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन

• कमण्डलु • पेन सलामत तो • मराठी कथा १९६२ • व्यासपर्व

दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

—संपादक

### कवित्वाची परिसीमा

**यशवंतांची** कविता वाचतांना आपण वेगळ्या काळांत वावरत आहोंत असें वाटतें. कारण आज कविता म्हटल्यावर जो आकृतिबंध आपल्या डोळ्यापुढें उभा राहतो त्याहून ही कविता वेगळीच आहे. नवकाव्य आतां मराठींत रुजलें. त्याची स्वतःची समीक्षापद्धतिसुद्धां निर्माण झाली पण ह्या काळांतहि यशवंतांची कविता वाचतांना तीच आपल्याला मागच्या पिढीच्या कालखंडांत घेऊन जाते. कवितेच्या मूल्यमापनासाठीं जे निकष आपण आतां वापरतो ते यशवंतांच्या कवितेबाबत लावता येणार नाहींत हें सत्य आहे.

मराठींतील पहिला संघटित प्रयत्न करणाऱ्या रविकिरण मंडळांतील एक तळपता किरण असा यशवंतांचा उल्लेख करावा लागेल. ते तेव्हांहि आघाडीवर होते आणि आजहि त्यांनीं महाराष्ट्रकवि हें मानचिन्ह प्राप्त करून आपल्या कवित्वाची परिसीमा गांठली आहे. दोन तपांपेक्षां अधिक काळ यशवंत सातत्यानें कवितालेखन करीत आहेत. आजहि संमेलनांत आपल्या गळ्यांतून महाराष्ट्राला रडविणाऱ्या 'आई' ह्या आर्त कवितेच्या ओळी ते तितक्याच तन्मयतेनें ऐकवित आहेत. 'कमण्डलू' हा यशवंतांचा नवा संग्रह.

यशवंतांच्या आतांच्या कविता वाचतांना एक गोष्ट प्रकर्षानें जाणवते कीं, काळ बदलला, कवितेकडे पाहण्याची दृष्टी बदलून गेली म्हणून ते थबकले नाहींत. बदलत्या काळासोबत त्यांनीं आपल्या कवित्वाला गति दिलेली आहे. आणि हें करीत असतांना आपलें जुनें वळणहि त्यांनीं प्रकर्षानें राखून ठेवलें आहे. ह्या त्यांच्या कृतींतूनच त्यांच्या कवितेला विषयाची तूट पडत नाहीं. केवळ अस्फुट सौंदर्यांत रमून Pure Poetry चा डंका मिरविण्याचा त्यांना कधींच सोस पडला नाहीं. तर ते अजूनहि देशभक्तीच्या, महात्म्यांच्या 'महात्मन! करतो जयजयकारा'–म्हणून रूपापुढें लीन-

'पंच पंच उपःकाल' आठवतांना
पाकळ्यांच्या मंडपांत
सुगंधाचें स्वयंवर
रंगकिमया नोवरी

जोडा जमला सुंदर, अशा भावपूर्ण ओळी लिहून जातात. 'सेवेस उभा मी' वेगाची विलसितें, उंच चढा! उंच चढा! या हो योगेश्वरा, मी आणि मी, अवतार कथांचे कोणा कौतुक आणि 'ही कविता' ही नुसती कवितांची शीर्षकें जरी पाहिली तरी त्यांच्या विषयवैविध्यतेची ओळख पटते. बलिदान, राष्ट्रभूमि, सुहृदांनो ह्या कवितांत तें रंगून गेलेले आढळतात. आपल्यांतल्या न्यूनाची आणि सामर्थ्याची त्यांना स्वतःलाच पुरेशी जाण आहे.

अर्पियला नजराना
उरलें हें तबक रितें
हाताचा स्पर्श तुझ्या
घडला परि तबकातें--अशी 'मूक व्यथा'

ते साध्या सोप्या शब्दांत मांडतात.

'मृगजळ तें, त्याचा कां ध्यास वेसि व्यर्थ असा ?

अधिकाधिक कोरडाच व्हायाचा मात्र घसा ?' असें रोखठोक व्यवहारी सत्यहि तें 'स्वप्न पाहिलेस मना' ह्यांत सुनावतात.

यशवंतांनीं कवितेंतील अनेक स्थित्यंतरें पाहिलीं. त्यांत तें मिसळले. कांहीं पचविली तर कांहींत ते सगळे करतांना स्वत्व राखून उरलें आणि ह्याचें कारण त्यांच्याच ओळींनीं

'जर कांहि मागणें; एकच ह्या हें देवा
मज समर्थ ठेवा नित्य कराया सेवा!'

ह्या 'सेवेस उभा' मधल्या कवितेंत व्यक्त झालें आहे. ह्या त्यांच्या विनम्र वृत्तीमुळें त्यांची कविता मनाला भिडते आणि 'कमण्डलु'-तील कांहीं थेंबांची चव आठवत राहते.

( कमण्डलु कविः-यशवंत, कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणें. किंमतः-६॥ रुपये. )

—केशव मेश्राम

### मिष्किल विनोद कथा

**अंतर्मनाचे** पापुद्रे चिवडींत कांहींतरी गहनगूढ आणि स्वतःलाच न कळलेलें व्यक्त करण्याचा आव आणणारी नवकथा आणि पोरकट पांचट कोट्यांचा खच पाडणारी हास्यास्पद विनोदी कथा यांतून वाट काढीत पुढें येणाऱ्या चांगल्या कथाकारांची कथा आज कांहींशी गुदमरल्यासारखी झाली आहे. उच्चभ्रू नाकेले लोक ती पुरेशी खडबडीत म्हणून तिला सपक आणि सपाट आणि सपाट म्हणून तिची उपेक्षा करतात तर भुसभुशीत लिखाण करणारे सवंग लेखक ती पुरेशी खमंग नाहीं म्हणून नाकें मुरडतात.

अशा परिस्थितींत अभिरुचीसंपन्न वाचकांचीं मनं जिंकणारी मिष्कील विनोदकथा वसंत पुरुषोत्तम काळे यांच्या 'पेन सलामत तो'—या कथासंग्रहांत आढळेल. अलिकडे विनोदाचा 'बाजार' उभारणाऱ्या बाष्कळ मासिक पुस्तकांतून आढळणाऱ्या फोलकटांपेक्षां या कथासंग्रहांतील विनोद अतिशय दर्जेदार आहे. शब्दरचना, भाषाशैली, व्यक्तिचित्रण, प्रसंगांची गुंफण या सर्वांतून विनोदाचें कारंजें उभें करण्यांत श्री. काळे यांनीं यश मिळविलें आहे.

'पेन सलामत तो'—ही यातील पहिलीच कथा या सर्व दृष्टीनें वाचनीय आहे. नाणसाळी





अनुक्रमणिका

काहींतरी हातीपायी चाळा असतो. कुठेही असला तरी कागदावर काहींतरी खरडण्याची अविला सवय असते. या सवयींपायी अनेकांचे विलक्षण गैरसमज होतात आणि अखेर त्याला बिनभाड्याच्या खोलींत जाऊन हवा खाण्याची वेळ येते. ( अर्थातच थोडक्यावर निभावते. )

चष्मा बदलला कीं माणसाची दृष्टी बदलते हे खरं. पण दृष्टीबरोबर वृत्ती देखील बदलते ही कल्पना खरोखरच मिष्किल आहे. या संग्रहातला बराचसा विनोद आणि मिष्किलपणा कथानकाच्या मूळच्या विक्षिप्त कल्पनांतच भरलेला आहे. ' सुंदर ' तरुणींना स्कूटरवरून ऑफिसमध्यें पोचविण्याचा, बिझिनेस, पोस्ट-ऑफिसमध्यें ( यांतही मिष्किलपणा आहे ! ) भेटणारी ' मस्तानी ' एकवेळचं जेवण सुटावं म्हणून दुसऱ्याचा अंक ढापणारी ' फक्कड पोरगी ' ह्या सर्व कथांतील मिष्किलपणा मुख्यत्वें त्यांतल्या मूळ कल्पनांतच आहे हें सहज लक्षांत येईल. दात है तो बात है ही कथा कांहींशी भडक वाटते.

सर्व कथांत वेगळ्या प्रकारची विनोदी कथा म्हणजे 'बहुत दिन नच भेटलों.' वस्तुतः हा विषय एखाद्या पाटलाच्या हातीं गेला असता तर तो कुठच्या कुठें बहकला असता. पण विनोद आणि पोरकटपणा आणि शृंगार आणि अश्लीलता यांच्या मर्यादा श्री. काळे यांनीं समजून पाळल्या आहेत.

' हातचा ' ही कथा यांत शोभणारी नाहीं.

निवेदनांतील सफाई, सहजसुंदर भाषा, घटनांची ओनवती गुंफण, या सर्व गुणांनीं श्री. काळे यांच्या कथांत वाचनीयता आली आहे.

अशा कथा लिहतांना सवंग विनोदाचा मोह टाळायला हवा होता.

उदाः—'तिची पोझिशव पब्लिकमंदी ड्याम झाली होती ! यांत धड विनोद नाहीं, धड मिष्किलपणाही नाहीं. तसेच.' बस चुकली ' या कथेंत राजा बापटांच्या नांवावर आलेले विनोद देखील असेच हवा नसलेले आहेत.

असे थोडे अपवाद सोडले तर श्री. काळे यांच्या ' पेन सलामत ' या कथासंग्रहानें मराठींतील विशुद्ध विनोदी कथेंत नवीन आशास्थान निर्माण केलें आहे हें निरपवाद सत्य होय.

( **पेन सलामत तो**–लेखकः वसंत पुरुषोत्तम काळे, मेनका प्रकाशन, पुणें. २ मूल्य ३ रु.)

—श्रीपाद भागवत

## कथांचे रहाटगाडगे

**आघाडीवर** असणाऱ्या विनीच्या नवकथा लेखकापैकीं अरविंद गोखले हे एक होत. त्यांनीं संयोजित केलेल्या उपक्रमांत बारा लेखकांच्या बारा कथा आहेत. मधु मंगेश कर्णिक, जी. ए. कुलकर्णी, दस्तुरखुद्द अरविंद गोखले यासारख्या नांवाजलेल्या लेखकांपासून तो अनंत मनोहर, चिं. त्र्यं. खानोलकर, म. वि. कोल्हटकर यांच्यासारख्या नांवारूपास येऊं पाहणाऱ्या कथालेखकांच्या कथा यांत आहेत.

'जौळ' या कथेंत कर्णिकांचा नेहमीचा कोंकणी कस आहे. लागोपाठ सहा लेकी झालेल्या आपल्या सुनेला कैऱ्यांचे डोहाळे लागलेले पाहून मुलगा होणार अशा अंदाजानें तिला कैऱ्या मिळवून देण्यासाठीं धडपडणारी म्हातारी ही या कथेंतील वजनदार व्यक्तिरेखा आहे. परंतु विषय मात्र चाकोरींतला आहे. भाषा आणि निवेदन–पद्धती यांत सफाई आहे.

पराभव ही जी. ए. कुलकर्णींची समर्थ कथा आहे. माधव, त्याची आई आणि रुक्मिणी या तीन व्यक्तींच्या जीवनांतील भावद्वंद्व यांत चित्रित केलें आहे. जी. ए. च्या याच नव्हे तर अन्य कांहीं कथावर देखील मला अरविंद गोखल्यांचा ठसा जाणवला आहे. त्यामुळें त्यांची कथा पसरट बनते.

खुद्द अरविंद गोखले यांच्या विघ्नहर्ती शेजारी ती कथा ठेवली की हें साम्य अधिक स्पष्ट होईल. अरविंद गोखल्यांच्या वाचकाला मात्र ' विघ्नहर्ती ' विशेष आवडणार नाहीं. आपल्या पतीच्या निधनामुळें मंगलकार्य अडून राहूं नये यासाठीं सारें दुःख उरांत दाबून निर्विकार चर्येने भैय्याच्या मुलीबरोबर बाळासोहबाचें लग्न होईपर्यंत तोंड शिवून घेणारी काकू ही विघ्नहर्ती तर खरीच पण इतकी प्रभावी व्यक्तिरेखा असून अरविंद गोखल्यांची ही गोष्ट ' पराभव ' प्रमाणेंच ' ताण ' वाढवून लिहिल्यासारखी वाटते.

' वासना ' ही एक फसलेली कथा आहे. तर चिं. त्र्यं. खानोलकर यांची ' हिरवट उंच खोल रेघा ' ही एक दरिद्री कथा आहे. मराठी कथा म्हणण्यासारखें हिच्यांत कांहीं नाहीं. ही कथा तर नाहींच पण नवकथा म्हणून सुद्धां हिचें समर्थन कितपत होऊं शकेल हे प्रभूच जाणो.

श्री. दा. पानवलकर आणि अनंत मनोहर यांच्या कथा चटकदार आहेत. भावानुभवांचे पदर सोडविण्याचा उपरा उद्योग यांत नाहीं. पण कुत्रा चावल्यावर पिसाळलेल्या कुत्र्यासारखें होणारें मानवी परिवर्तन, पानवलकरांनीं जितकें रेखीवपणें उभे केलें आहे तितकेंच निव्वळ पत्रलेखनानें काल्पनिक प्रणयधुंद कथा उभी करून त्यांतील द्वंद्व सत्य आहे असा आभास निर्माण करून त्याचा ठसा मित्रांवर व वाचकांवर उमटविण्यांत अनंत मनोहरांचें सारें यश आहे. ही कथा पत्रात्मक आहे आणि पत्राची भाषा सुद्धा जितकी जिव्हाळ्याची तितकी शैलीपूर्ण आहे. विद्याधर पुंडलिक; ग. दि. माडगूळकर या दोघांच्या कथा चित्तवेधक आणि मनोभेदक आहेत. मांजराबद्दलच्या बाप–लेकांच्या परस्पर विरोधी भावगंडांचें चित्रण ' मी येऊं ' या कथेंत फारच अप्रतिम आहें. लोकांच्या बोलण्याचा अवीच्या मनावर परिणाम होऊन अखेर त्यानें काळीला मारणें हें क्वचित तर्कसंगत असेलही पण मला मात्र हा शेवट खटकला.

'पुरुषाची आई' ही ग. दि. माडगूळकरांची पोरावरील आईचें लोकविलक्षण प्रेम दाखवितें. माया–ममता आली की त्यांत संकेत, रुढी किंवा नैतिक आदर्श यावर बोळा फिरवायला माणूस कमी करत नाही याचें ' पुरुषाची आई ' हें एक उदाहरण आहे.

विजया राजाध्यक्ष, तारा वनारसे व उदयकुमार साळगांवकर या तिघांच्याही कथा मध्यम दर्जाच्या आहेत.

अखेर एक गोष्ट संपादनासंबंधी. मराठी कथेंतील त्या त्या वर्षातील प्रातिनिधिक कथांचा संग्रह म्हणून हे पुस्तक प्रकाशित करतांना त्यांच्या प्रातिनिधिकत्वावर प्रकाश पाडण्याचें कार्य संपादकाचें आहे. त्यासंबंधीं वास्तविक लिहिलें गेलें पाहिजे ? मला आवडल्या त्या कथा मी निवडीन हें ठीक, पण त्यावर कांहींही रसग्रहण न करतां त्या केवळ पुस्तक रूपानें प्रकाशित करीन, आणि त्यांनाच लोकांनीं प्रातिनिधिक म्हणावें असें म्हणण्यांत आत्मनिष्ठेचा आततायी अतिरेक होतो आहे. हें संपादन नव्हे तर दिवाळी अंकांतील वा इतर नियतकालिकांतील कथांचें पुनर्मुद्रण आहे.

( **मराठी कथा १९६२**:–संयोजकः–अरविंद गोखले, कॉंटिनेंटल प्रकाशन. किं. ३॥ रु. )

—श्रीपाद भागवत

## एक रसधुंद निर्मिती

'व्यासपर्व' वाचून संपविल्यावर पहिलाच प्रभाव जाणवतो शैलीचा. उद्गार निघतात, 'व्यासपर्व अपूर्व आहे.' मग विचार पडतो 'कोणत्या अर्थानं अपूर्व?' 'महाभारत' हा विषय अनेकांनीं अनेक अंगांनीं आजवर हाताळलेला आहे. तो विषयच कालातीत आहे. भविष्यकाळालाहि तो पुरून उरणार आहे. साहित्याची, कलेची, तत्वज्ञानाची वैश्विक दालनें अखंड धुंडून झाल्यावर कुणाहि चिंतनशील महामनानं महाभारताकडे वळावं किंवा उलट कृतीनें 'महाभारता'कडून विश्वदर्शनाकडे जावं. चिंतनाला धार आणि आधार देण्यासाठीं. असाच कोणतातरी आधार दुर्गाबाई महाभारताच्या चिंतनांतून धुंडीत असाव्यात व म्हणूनच एका धारदार भाष्याचा आविष्कार त्या ललितरम्यतेनें करून जातात. कधीं अर्ध चिंतनाला त्या संपूर्ण भाष्याची नक्षी जोडतात तर कधीं अर्ध भाष्याच्या कोरीव कामावर संपूर्ण चिंतनाचा प्रकाशझोत हळुवार हातानें सोडून देतात. 'प्रस्तावनेच्या अतिभव्य व दैदिप्यमान प्रवेश दालनांतून आंत गेल्यावर दुर्गाबाई शब्दशिल्पांतून उभ्या करतात. त्या प्रत्येक चित्राकृतीकडे पहात रसिक समरसता व समाधि साधूं लागला कीं वाटतं, लंडन शहरांतील मॅडम टुसॉडच्या चित्रमंदिरांत तर आपण चुकून आलों नाहीं ना? प्रत्येक व्यक्तित्व किती सजीव, संपूर्ण आणि आकर्षक! पण क्षणांतच टुसॉडचें उपमान किती अपुरें आहे याची प्रचीति येऊं लागतें. टुसॉडच्या कलाकृती अबोल आहेत. दुर्गाबाई सारख्या बोलतच रहातात. चिंतनसुद्धां त्या प्रकटपणें करतात. कृष्णाचें जीवन त्यांना मोहवतें. तो त्यांना पूर्णपुरुष वाटतो. आणि अर्धपार्थिव सुद्धां! विद्यावंतांची बधिरता हा संकृतीला लागलेला मोठा शाप आहे असें त्या म्हणतात, आणि त्या बधिरतेचं प्रतिक म्हणून द्रोणाचं चित्र रेखाटतात. अश्वत्थाम्याची मूर्ति त्यांना गुदमरल्यासारखें करतें. दुर्योधन हा त्यांच्या मतें व्यक्तिरेखा हरवलेला माणूस. उलट कर्ण हा एकाकी. सदा स्वतःच्या न्याय्य स्थानापासून बाजूला टाकलेला असा त्यांना दिसतो. त्यांच्या दृष्टींतून अर्जुनाचें व्यक्तिमत्त्व दुभंगलेलें दिसतें आणि तो परीकथेंतून वास्तवाकडे येणारा एक पुरातन कथानायक एवढंच त्याचं दर्शन त्या देतात. युधिष्ठिर हा पथिकांपैकीं एक मुक्त पथिक. शांतीचा घुटका घेत तो अखेरी आपल्या पथिक भावंडांबरोबर मुक्त होतो. तरूणपणांतच अश्रु हरवून बसलेला माणूस भीष्माशिवाय दुसरा कुणी त्यांना आढळत नाहीं. विदुराचें वर्णन त्या 'माणसांत विरलेला माणूस' असं करतात. शेवटीं उरते द्रौपदी. तिची संभावना त्या 'कामिनी' या एकाच शब्दानें करतात. मात्र आर्ततेनें शेवटीं लिहून ठेवतात..., 'तिच्यांत असलेला पार्थिवतेचा विलक्षण चैतन्यमय स्रोत फक्त कांहींनाच कधीकाळीं जाणवेल असा आहे.' पुस्तक मिटतं. पण डोळे उघडतात. मन मग पुनः झेपावतं प्रस्तावनेकडे. प्रस्तावना वाचल्याखेरीज आंतील चित्रदर्शनाला कुणी जाऊं नये आणि दर्शनोत्तर पुनः प्रस्तावनेचा घुटक्या घुटक्यानें आस्वाद घेतल्यावरच 'व्यासपर्वा'च्या अपूर्वाईची ओळख पटते. प्रारंभीं अंधारांत डोळे फाडून पहात असणाऱ्या लेखिकेला अंतीं डोळ्यापुढील अंधार नाहींसा होऊन एक भावनातीत भावानुभव प्राप्त होतो. प्रारंभीं प्रत्येक व्यक्ति आपली ठाम आपल्या साच्यांत रुतून बसलेली त्यांना दिसते; पण मग कृष्णवाणीचे झंकार अधिकाधिक त्यांच्या कानावर झंकारीत होत जातात. अधिक स्पष्ट होतात. मग अवाचनीया तें वाचनीय, रुक्ष तें सरस, अशी अधिक जवळीक निर्माण होते. पात्रांचे परिमाण, त्यांचे आकार आणि समग्र कथेंतलें त्यांचें प्रयोजन तिला वेगळ्या संदर्भांत दिसूं लागतें.

त्यांना सिद्ध झालेली हीच पुनःप्रचिति दुर्गाबाई ललितकलेच्या तरल तन्मतेनें 'व्यासपर्वा'च्या पानापानांतून, पत्रावळींतून, परिच्छेदांच्या द्रोणांतून, वाक्यांतून आणि शब्दांतून रसविपुलतेनें भरभरून देतात. ही करामत करतांना त्या पांडित्याचें अवजड गाठोडें किती अलगत बाजूला नेऊन ठेवतात आणि महाभारताचें विलक्षण जाडें-भरडें वस्त्र विसवून पुनः तें तरल कोमल तंतूंनीं सिद्धहस्ततेनें विणून त्याला 'नायलॉन'चा तलमपणा आणि पारदर्शिकत्व प्राप्त करून देतात. आणि या सर्व क्रियाप्रक्रियेंतून एक सक्रियता त्या साफल्यानें साधतात ती म्हणजे प्रकट अप्रकटतेनें, वाच्यार्थानें आणि व्याजोक्तीनें. कधीं धूसरतेनें तर कधीं गडद स्पष्टपणें त्यांनीं साकार केलेली व्यासप्रतिमा. अमूर्त, अव्यक्त व्यासदर्शनच अंतीं 'व्यासपर्वा'त आत्म्याला हात घालतें अन् अंतरींचा ठाव घेतें. त्यांनी व्यासाच्या दोन मूर्ति कल्पिल्या आहेत. एक बाहेरचा व्यास आणि दुसरा आंतला व्यास. मग त्या दोहोंचाही समन्वय सांधून त्या व्यासाची एक जडणघडण अशी जोडून जातात कीं पुनः अमरपणांतून अमरपणांकडे व्यास वाटचाल करूं लागतात. त्या म्हणतात, 'व्यासाची कलादृष्टी जाणतें एकच तत्व. कालाच्या सर्व थरांतून, मानवामानवांतून वाहणारी माणुसकीची संततधार. जिथें ती धार खुंटते, तिथें व्यासाचा कलानिष्ठ क्रोध, त्याचा दुःखावेग उसळून उठतो. आणि तो आपल्या आकृतींत खरे रंग जीव भरून ओतूं लागतो. जीवनाच्या तालावर मृत्यूचें संगीत गाऊं लागतो...' व्यास जीवनाशीं भावुकतेनें एकजीव झालेल्या दुर्गाबाईच्या काव्यप्रवृत्ति 'व्यासपर्वा'च्या निर्मितींत एक शैलीचें अतीव सुंदर लेणें अंगावर लेवून अंतर्मनासमोर नर्तन आणि संगीत लहरीलहरींनी अभिव्यक्त करीत जातात. तेव्हां काव्यानंदाच्या ब्रह्मांत आत्मा टाळ्या पिटींत देहभान हरवून टाकतो. वैचारिकतेच्या सामाजिक व सार्वजनिक शास्त्रीय दृष्टिकोनांतूनच महाभारताचा वेध घेणाऱ्या प्रच्छन्न बुध्दिवाद्यांनीं 'व्यासपर्वा'ची शैलीदार आणि रसधुंद निर्मिती आत्मलक्षीत्वाने जरूर न्याहाळावी. महाभारतांतील सर्वव्यापी व्यक्तिमत्वांवर उत्कट आत्मनिष्ठतेनें चित्रात्मकता आणि नाट्यमयता साधतांना दुर्गाबाईंनीं मराठी भाषेला प्राप्त करून दिलेली सुबोधता आणि संपन्नता यांतच 'व्यासपर्वा'ची 'अपूर्वता' सर्वमान्य व्हावी.

—प्र. श्री. नेरूरकर

व्यासपर्वः—दुर्गा भागवत, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४.






**मीरूयाचा डोंगर**

...पान १० वरून

आणि तिला कसं कळलं कुणास ठाऊक ? योगायोग. कदाचित् नायकांच्या जातीला वासच येत असावा ! आधीं ध्यानांत आलं आणि लगेच तिनं खात्री करून घेतली.

विजय तिच्या मागून येत होता. तिचा पाठलाग करीत होता.

थोडं आश्चर्य, बरीच मजा वाटली वासंतीला. एक नवा अनुभव, न्यारा, गहिरा. कल्पनेनंच ती बहरली, डंवरली. खुदकन् हंसली.

सरळ पुढं झाली असती तर...?

पण छेः ! त्यांत गंमत नव्हती. तें अगदींच बेचव, पोरकट झालं असतं. रानांत, एकीकडे, एकान्तात-कथाकादंबऱ्यांतून वासंतीनं खूप वाचलं होतं. आणि सिनेमांतसुद्धां पाहिलं होतं.

होय ! तिला हीरॉईन व्हायचं होतं. कादंबरींतली, सिनेमांतली. हिरॉईन तिच्यासारखीच असते. सुंदर, सुरेख, आणि अशा प्रसंगीं अभिनयसुद्धां किती छान करते-किती छान ! वाटतं, वाटतं कीं—

आणि तिच्या मनांत कांहीं आलं. एकदम मस्त कल्पना. अगदीं सिनेमांत हिरॉईन हंसते तशी ती मिस्कील हंसली. मान मोडून तिरप्या डोळ्यानं तिनं विजयकडे पाहिलं. आणि लगबग ती बाजूला झाली. झुडुपाच्या आडोशाला लपली. वाट बघत, विजयची.

बूट वाजवीत, शीळ घालीत विजय आला. वासंतीला त्यानं इथं, काजूच्या झाडाखालीं उभी असलेली पाहिलं होतं. मग-मग एकदम कुठं नाहीशी झाली ही ? डोळा चुकवून कुठं गेली ? तो विचारांत पडला, आजूबाजूंला बघूं लागला.

तसं मागून येऊन वासंतीनं त्याला छेडलं, ' काय हो ? '

विजय गर्रकन् वळला. हंसत त्यानं तिच्याकडे पाहिलं.

चप्पल हातांत घेऊन ती उभी होती. ' तुम्हाला मी सभ्य समजत होतें ! '

' म्हणजे ?' हा काय प्रकार आहे, त्याला कळेना.

' कां मागं लागलां आहांत माझ्या !' तिचा आरोप.

' अहो, भलतंच काय ?'

' भलतं मुळींच नाही. पाहिलंय मी. केव्हांपासून पाठलाग चालवलाय तुम्ही—माझा.'

' म्हणजे कमाल झाली !'

' रानांत एकटी दिसलें. तुम्हांला वाटलं—'

' अहो, पण—'

' पण म्हटलं, दाजी नावराची लेक आहे मी. चप्पल खावी लगेल.' चप्पल नाचवीत वासंतीनं म्हटलं, ' पुन्हा वाटेला जाऊं नका माझ्या. चला, व्हा चालते !'

विजयला तिनं बोलूंच दिलं नाहीं. फक्त सुनवलं. हें असं. आणि पोरं खुश होती. मोठाच पराक्रम केला होता तिनं.

' आणि गेलों नाहीं तर ? विजयनं तिच्याच स्वरांत तिरसट प्रश्न केला.

खरोखरच त्याला राग आला होता. नसता हा गजबज ऐकून सुरुवातीस तो गोंधळला खरा. पण या शिष्ट पोरीचा खराच तसा समज झाला आहे असं जेव्हां त्याला वाटलं तेव्हां मात्र तो भडकला. त्याचा अभिमान दुखवला होता. म्हणजे स्वतःला ही समजते तरी कोण ? कोणी असली आणि कांहीं असलं तरी त्याचा अपमान करायला तिला अधिकार नव्हता.

पण हिरॉईनची भूमिका वासंतीच्या पार डोक्यांत चढली होती. एक कैफच तो. त्या क्षणाला तरी तिला दुसरा विचार उरला नव्हता.

' नाहीं गेलों तर—तर ?' त्याचाच प्रश्न तिनं उलट फिरवला. आणि चप्पल उगारून सरळ ती त्याच्या अंगावर आली.

विजयनं वरच्यावर तिचा हात धरला. घट्ट पकडून ठेवला.

' हात सोडा.' वासंती ओरडली.

' नाहीं सोडणार.'

' बघा हं ! मी ओरडेन.'

' खुशाल.'

' गर्दी जमेल.'

' बरंच होईल !'

' बरं काय ? मार खाल. दांत पडतील.' वासंतीनं भीति घातली.

' खाईन मार.' विजयनं जाब केला. ' नाहींतरी दांत पडलेच आहेत.'

' म्हणजे ?'

वासंतीनं चमकून त्याच्याकडे पाहिलं. एकच क्षण नजरा भिडल्या. त्याच्या डोळयांत तिला जखम दिसली, व्यथा जाणवली. भासही असेल ! आणि-आणि तिला शंका आली. वाटलं चुकलं, तर नाहीं आपलं ? तिची मान खालीं गेली. अवसान गेलं. आणि तशी हातांतली चप्पल आपोआप गळून पडली.

पण त्यापूर्वीच विजयनं तिचा हात सोडला होता. तो पुटपुटला, ' क्षमा करा.'

बस्स ! दोनच शब्द !

आणि पाठ फिरवून तडक तो निघालासुद्धां.

' क्षमा ?' वासंतीला काय बोलावं समजेना. तिचा गोंधळ झाला होता. सगळीच गुंतागुंत. कोळ्याचं जाळं आणि त्यांत खुद्द कोळीच गुंतत चालला होता.

' अहो—' तिनं साद घातली

विजय थांबला. तिच्याकडे एक उद्धट कटाक्ष टाकून तीव्रपणं तो म्हणाला, ' तुमचा हा पराक्रम दाजींना कळूं दे.'

' हें काय हो ! माणसाचा गैरसमज नाहीं वाटतं होत !' जमिनीकडे बघत वासंतीनं विचारलं. विरघळलेला आवाज, थोडे शब्द-अर्थ खूप. मध्येच एकदम मान उचलून तिनं त्याच्याकडे बघितलं. गाल फुगवून, ओठ मुरडून ती हंसली. लाडंलाडं, आंबटगोड.

पण विजयचं लक्षच नव्हतं. तो कडवटपणं बोलला, ' दाजींना वाटतं—'

' काय ?'

' लेक लहान आहे. गर्दींत कुठं चुकेलबिकेल !'

' म्हणून माझ्यावर लक्ष ठेवायला तुम्हाला सांगितलं कीं काय दाजींनी ?' डोळे मोठे करून तिनं विचारलं.

' गाढव मी ! ऐकलं त्यांचं. चांगली अद्दल घडली म्हणा !'

' चच् ! सॉरी हं ! मला काय ठाऊक ?'

' नाहीं ठाऊक. तर करून घ्या ! प्रत्येक पुरुष मवाली समजूं लागलां तर पुढं कठीण आहे. ' विजयनं उसळून म्हटलं, ' बाप तसा, लेक अशी—चक्रम ! '






वासंती चिडून म्हणाली, 'माझा राग दार्जीवर काय म्हणून ? काय बोलायचं तें मलाच बोला.'

'बाईसाहेब, वेळ नाहीं मला. तुमच्या या गांवचीं उपद्व्यापी लोकं कार्यक्रमांत आयत्यावेळीं गोंधळ करण्याच्या उद्योगांत आहेत. दार्जीनीं मनांत घेतलं असतं तर—तर कांहीं झालं असतं. केव्हढ्या आशेनं आलों होतों. पण ते मुळीं ऐकून घ्यायलाच तयार नाहींत. त्यांना जरूर नाहीं. काय तें तुम्ही बघा म्हणतात. ती सगळी कंपनीची जबाबदारी...'

हें असें नसतं. कांहीतरी बडबडत विजय वाटेला लागला. लांब टांगा टाकीत घाईनं तो जात होता. घांदलींत असावा, काळजींतसुद्धां. म्हणूनच लागेल त्या पायवाटेनं तो धांवत होता. नाहींतरी सगळ्याच वाटा तळपीवर जात होत्या. तेव्हां चुकायची तशी धास्ती नव्हती.

मागं विजयच्या पाठमोऱ्या आकृतीकडे वासंती कितीतरी वेळ बघत होती. करवंदं तोंडांत टाकून आंबट मिटक्या मारीत उभी होती. वेडेपणा तिचा—नाहीं तर काय ? म्हणून चप्पल मारायला उठली त्याला. आणि त्यानं तिचा हात धरला होता. घट्ट पकडून ठेवला. किती दणकट तो हात. आणि केसाळसुद्धां. इश्श ! पण भडकला कीं आणखीनच छान दिसतो विजय. तेव्हां कांहीं वाटलं नव्हतं. पण आतां आठवणीनंच वासंती लाजली, शरमेनं अर्धीमेली झाली. तोंडावर दोन्हीं हात घेऊन— पण नाहीं., छातींत कसंसंच होऊं लागलं. जाड काळ्याभोर भिवया, धीट अन् उद्धट डोळे, नुकतीच दाढी केलेला नितळ हिरवा निळा चेहरा तिच्या डोळ्यापुढून हलेचना. तिच्यावर विजय रागवला होता. आणि तसा तो तिला आवडला होता.

सूरसरगम लागले. नादतरंग उठले. कविता शब्दमय झाली. संगीत अर्थशब्द झालं.

'उंची उंची दिवारोंको तोडके जी तोडके.

आया रे तेरे लिये सारा जग छोडके...'

वासंतीच्या हृदयांत गाणं जागं झालं, सुरूं झालं. तेंच गुणगुणत तीं चालूं लागली.

'यार मिला, दिलदार मिला

मुझे एक नया संसार मिला...'

प्रथम तिच्या ध्यानांत आलं नाहीं. ती आपल्याच नादांत बाद झाली होती. रंगांत दंग झाली होती. तिला वाटलं तिच्याबरोबर अवतीभंवती रान गात होतं. बाजूला डोंगर गात होता. गांव गात होतं.

उशीरांच असेल, पण तिच्या लक्षांत आलं—हा बँडचा आवाज आहे. त्या आवाजानं उभं डोंगररान गजगजत होतं, वाजत गाजत उठलं होतं. तिच्या हृदयांतील गाणं बँडवर चाललं होतं. प्रथम मंजुळ गोड स्वरांत, आणि मग भसड्या घों घों आवाजांत—

'आया रे तेरे लिये सारा जग छोडकेऽऽ'

'अय्या ! काय वेडी तरी मी !' वासंती मोठ्यानं पुटपुटली आणि धुम पळत सुटली. शाळेची घंटा चुकेल म्हणून लहानपणीं ती अशीच धांवायची.

**कांहीं नाटकी संज्ञा**




दिग्दर्शन

## २

**तळपीवर** तोबा गर्दी उसळली होती. जत्रेलाही होत नाहीं इतकी. गांवचींच नाही, तर पांचपंचवीस मैलांवरून लोकं लोटली होतीं. एव्हढं मोठं मोकळं मैदान, माणसांनी खच्चून भरलं होत. पाय ठेवायला वाव नव्हता. धांवाधांव, रेटारेटी, नुसता गोंगाट माजला होता—गांवचीं लोकं गांवढळ, अडाणी. त्यांना शिस्त नव्हती, रीत नव्हती. कोणी शिकवलीच नव्हती आणि शिकवून फायदाही नव्हता. तीं शिकली नसती.

बाजूला खास मंडप उभारला होता. महामायेच्या सप्ताहांत गाभाऱ्यांत आरास करतात तसा. झगझगीत, लखलखीत. कोसावरून लक्ष जाई. डोळे दिपून जात. आणि लोकं मग बाहेरच उभं रहात. ती भीती. त्यांना वाटे हा थाट, आपल्याकरितां नाहीं. बड्या लोकांसाठीं आहे.

आणि हें खरं होतं. मंडपांत फक्त निमंत्रितांना प्रवेश होता खास पाहुण्यांना—धन, दान, पान, अधिकार, समाजसेवा यापैकीं एक किंवा अनेक क्षेत्रांत नांवलौकिक असलेल्या लोकांसाठीं. आणि यांतही वर्गवारी होती, अनुक्रम होता. कंपनीचा मॅनेजर राजाभाऊ गोखले तिकडे कांटेकोरपणं लक्ष देत होता. पंचा, हातांत काठी अशा वेषात अण्णागुरुजी उगाच फिरत होता. निमंत्रित मंडळींत भाऊ कुलकर्णी आणि गुणाजी नाडकर्णी, वसंत बापला आणि बाळ्या नाबर उपस्थित असूनही नसल्यासारखे झाले होते. चूपचाप, आवाज नाहीं.



अनुक्रमणिका

बाहेर पोलिसांचा खूप बंदोबस्त होता. पोलीस पाटलांची धावपळ तर विचारूं नका! प्रवेशद्वारावर उभा राहून फौजदार जातीनं लक्ष देत होता. समारंभासाठीं खास तयार केलेल्या रस्त्यावर एक जीप गाडी फिरत होती. कण्यांतून कोणीतरी बोंबलत होतं–

'रस्त्यांत गर्दी करूं नका. मिरवणुकीला वाट द्या. डेप्युटी मिनिस्टर सावंतजींचं स्वागत असो!'...

उगवतीला वर तळपीकडे येणाऱ्या रस्त्यानं बॅन्ड वाजूं लागला तसा 'आली, आली' म्हणून गर्दीत एकच हलकल्लोळ उठला. गप्पा टाकून लोकं धांवलीं. दुतर्फा रस्त्याच्या कडेनं दाटीवाटीनं उभीं राहिली. बायकापोरं, म्हातारीकोतारी गिल्ला करीत पुढंपुढं करूं लागलीं. झुंबड उसळली, धक्काबुक्की सुरू झाली. बायकांचीं तोंडं वाजूं लागलीं. पोरं ओरडूं लागलीं. बाप्या लोकांच्या तोंडून समजावणीचे बोल निघूं लागले.

...आघाडीवर बॅन्डवाले. थोडेथोडके नाहींत, तरी पांचपन्नास. त्यांचा लालभडक गणवेश, तऱ्हेतऱ्हेचीं तीं वेडीवांकडीं वाद्यें. सनई सारख्या संथ, कर्णमधुर स्वरांत लयबद्ध सुरवात आणि मग फाटल्या, फटफटल्या आवाजांत कर्कश साथ—

"उंची उंची दिवारोंके तोडके जी तोडके
आया रे तेरे लिये सारा जग छोडकेऽ...'

पाठोपाठ लाल, हिरवे पटके बांधलेलीं पिवळ्या डगल्यांतील घाटीं लोकं लेजीम खेळत आलीं. छन खळ, खळ छन, लेजीम चालली होती. फेर धरून घाटी जोषांत फिरत होते. पटक्यांचीं टोकं हिसक्यानं उडत होतीं. मध्यें डफ घुमून वाजत होता–डुम डुम पट डुम, डुम डुम पट डुम...

मागून दिंड्या–पताका नेऊन भजनी मंडळ येत होतं. खण खण टाळ, धुगुधुगु मृदंग. त्याच तालांत आवाज लागलेले. एकसाथ, एक भाव—

'आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी
बोलिले जे ऋषी–साच भावें वर्ताया...'

या भजनाची चालच इतकी गोड होती कीं गर्दीत ती तेव्हांच पसरली. लोकं रंगलीं. त्यांच्या वृत्ति आपसुख तल्लीन झाल्या. तीं डोलूं लागलीं. गर्दीनंही ताल धरला—

'आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी—'

आणि तशी भजनमंडळांत सामील असलेली सावित्री भिंगरीसारखी उडाली. इतका वेळ डोक्यावर पदर घेऊन ती गप्पच होती. गिरकन् फिरकी घेऊन डोईवर तुऱ्यासारखा पदर नाचवीत ती पुढं झाली. पायांत चाळ, कमरेला पट्टा–तमासगारणीसारखी कमरेंतून वांकत अन् छातींतून लचकत हिनं वरच्या टिपेंत लकेर घेतली.—

'झाडूं संतांचे मारग आडरानें भरलें जग—'

गर्दीकडे बघून साळुंकीच्या तोऱ्यांत तिनं मान मोडली. घावर-ल्याचं मस्त नाटक केलं. आडवा डोळा घातला. आणि मागून येणाऱ्या डेप्युटी मिनिस्टरच्या ट्रककडे बघत पदरानं ती रस्ता झाडूं लागली. छातीवरचा पदर पुरता ढळला होता. पण तिला याचं कांहीं नव्हतं. उभार छाती उडवीत ती तशीच उठली. पुढं गाऊं लागली—

'इच्छिदाचा भाग—शेष उरलें तें सेवूं
आम्हीं वैकुंठवासी आलों याचि कारणांसी'...'

गर्दीत लेकीचा हात धरून धर्म्या रस्त्यावर पुढंच उभा होता. शकूनं बापाला म्हटलं, 'दादा, आऐ बघ!'

'होय, तीच रांड!' धर्म्या पुटपुटला, 'नाचतीय बघ कशी!'

'छान!' पोरीला आईचं कौतुक झालं होतं.

'माझ्याजागीं दुसरा कोणी होता तर पेकटांत लाथ घालता.' धर्म्या त्वेषानं हात चोळूं लागला.

पण तो हें बोलतो इतक्यांत मिरवणुकींत घुसून बंड्या नाबरानं हात धरून सावित्रीला खेंचली.

'हात रांडे!' बंड्या गुरगुरला, 'त्या तमाशांत सामील काय?'

'तूं रे कोण मुडद्या?' सावित्री चवताळली.

'बंड्या नाबर! मुडदा नाहीं मी. आणि हें तुला खूप ठाऊक आहे.'

'हूं:! सोड हात. हात धरायला नवरा आहे मला.' सावित्रीनं त्याच्याच शब्दांत जाब दिला.

'सावित्री—'

'अरे जा!'

'बंड्या त्वेशानें सावित्रीच्या तोंडाकडे बघत राहिला. तसा हिसक्यासरशीं तिनं आपला हात सोडवून घेतला आणि वर दम दिला, 'पुन्हा दंगा केलास तर पोलिसांना सांगीन हां!'

मिरवणुकींत मध्यंच व्यत्यय कां आला म्हणून बघायला पोलीस धांवलेच होते. त्यांना बघून सावित्रीला अवाच्य शिव्या देत बंड्या नाबर मागं फिरला.

मागं द्वारक्या कुळकर्ण्यानं नेमकी हीच संधि टिपली. बॅन्डवाले आणि लेझिमवाले पुढें गेले होते. भजनी मंडळ बंड्या नाबरानं हें असं थोपवलं होतं. द्वारक्याला मिरवणुकींत मोकळी जागा सांपडली. आणि तशी द्वारकानाथाची टोळी भराभर उड्या टाकीत धांवली. मध्यं ताठ उभा राहून द्वारक्यानं दोन्हीं हातांनी बोंब ठोकली—

'अरे मेली रे, मेली रे, मेली–कंपनी साफ मुडदा होऊन पडली.'

आणि तेव्हां कुठं लोकांचं लक्ष गेलं. मिरवणुकीकडे लागून राहिलेले गर्दीचे डोळे गर्रकन इकडे फिरले. म्हणजे? अरे भाऊ कुळकर्ण्याचा द्वारक्या हा! आणि...हीं...हीं...बामणांचीं पोरं... कुळकर्ण्यांची, नाडकर्ण्यांची, नाबरांची! पोरांनीं काय चालवलंय् हें? छा: छा:! काय अजब–आश्चर्यांतलं आश्चर्य! गर्दीचं कुतुहल वाढलं, उत्सुकता शिगेला गेली आणि तसं मिरवणुकीचं कौतुक संपलं. डेप्युटी मिनिस्टर, शेंशंभर ट्रकांचा तांडा, खडखडत येणारे ट्रॅक्टर, सूं सूं करणारे डंपर—छे:! लोकांना त्यांत गंमत नव्हती. पोरं मात्र ओरडत होतीं, 'अग आऐ, अरे दादा बघ, बघ...' पण गर्दीचं लक्ष उडालंच. आणि तें खिळलें–मिरवणुकीची वाट अडवून बसलेल्या बामणांच्या पोरांवर!

बहुरुप्याचं सोंग काढून बाळ्या नाबराचं थोरलं पोरगं नाचतगात होतं—

साळूबाई, काळूबाई, गणपतराव, शीरपतराव,
बंडू न् गुंडू अन् चिंगी न् रंगी अहो मयताला चला—
बारश्याचे पेढे गेले, अहो लगिनाचे लाडू गेले,
आतां बाराव्याचे वडे खाया मयताला चला—
घाटावरचा भट आला, बकाबका घास वकला
अहो वाखा झाला त्याला, चला मयताला चला—'







अनुक्रमणिका

बहुरूप्याच्या सोंगानं अशी बहार उडवून दिली होती. लोकं खो:खो. हंसत होती. एकदम खुश ! म्हणजे ही गंमत त्यांना आवडली, बिलकुल पसंत पडली.

तोंवर तिरडी बांधून तयार झाली होती. चौघांनीं तिला खांदा दिला. द्वारक्या कुळकर्ण्यानं: गाडगं घेतलं. लोकं माना उंचावून आणि डोळे फाडून बघत होतीं. तिरडीवर पांढऱ्या वस्त्रांत अगदीं प्रेताचा आकार होता.

'धन्यानूं, काय हें ? छा:, अवचिन्ह !' गर्दींत चारपांच हळहळले.

द्वारकानाथानं खड्या आवाजांत जाब केला, 'लोकहो, आनंदाची वार्ता. कंपनीला पांढरा डसला. ती तडफडत मेली. बेवारशी प्रेत पडलेलं दिसलं. म्हटलं जाळावं, काय ? तेव्हढंच पुण्य ! राम बोला, भाई राम बोला.'

आणि बरोबरच्यांना डोळा घालून तो चालूं लागला.

तसा एकच गजर झाला, 'राम बोला, भाई राम बोला.

आणि टाळ खणखणले, मृदंग वाजूं लागला. श्रीकान्तनं सुरुवात केली. पोरांनीं गळा काढला. मयताच्या पुढं भजन सुरू झालं—

"नको नको मना गुंतूं मायाजाळीं
कंपनी ही आली, गिळावया—
आपुलीच आळ आपुलेंच बळ,
धांवे खाया फळ–मायाविनी—'

हें बघून बाजूला कंपनीच्या भजन मंडळीनं आवाज चढविला—

'आम्ही वैकुंठवासी आलो याचि कारणासी—'

आणि चढाओढ सुरू झाली. जिद्द लागली. धंदेवाईक भजनी मंडळ एकीकडे, दुसरीकडे बामणांचीं हीं करनकरीं पोरं.

भजनी मंडळानं म्हणावं, 'झाडूं संतांचे मारग, आडरानें भरलें जग.'

पोरांनीं मोठ्यानं ओरडावं, 'देतें आहे शाप उभें गांव—
आयत्या बिळांत रिघूं बघे आर...'

पुन्हा भजनी मंडळाचा आवाज उसळावा—

'उच्छिष्टाचा भाग, शेष उरलें तें सेवूं। आम्ही वैकुंठवासी...'

उसळी घेत पोरांनी जोर करावा, 'भलेतरी देऊं...'

भजनी मंडळाला सराव होता. त्यांची माणसंसुद्धां अधिक. त्यांच्यापुढं पोरांचा काय टिकाव लागणार ? त्यांची दमछाट झाली. आवाज पडला, खालीं येऊं लागला.

पण तीं एकटीं नव्हतीं. गांव जिवंत होतं अजून. कुठून-कुठून तरणीताठीं पोरं उड्या मारीत बामणांमागं उभी राहिलीं. पोरंच नाहींत, मोठी माणसंसुद्धां. त्यांनीं जोरदार आवाज उठवला—

'भलेतरी देऊं सोडून लंगोटी
नाठाळाच्या पाठीं हाणूं काठी—'

पव्हाना पोलिसांनी त्यांना गराडा दिला होता. दंडुके सरसावून खाकी वेषधारी लोकं त्यांच्याभोवती साखळी करून उभीं होतीं.

कमरेचं रिव्हॉल्व्हर काढून फौजदार डी. एस. पी.च्या तोंडाकडे बघत होता. कंपनीचा मॅनेजर राजाभाऊ तावातावानं बडबडत होता. डी. एस. पी. अधिकच गोंधळला होता.

ट्रकमधून उतरून डेप्युटी मिनिस्टर पायीं चालत तिथपर्यंत पडकले. कंपनीचे दोन्ही मालक आणि कलेक्टर त्यांना वाट करून देत होते.

'काय गडबड आहे ?' डेप्युटी मिनिस्टरांचा प्रश्न.

'सर, या पोरांनीं दंगा चालवलाय्.' डी. एस. पी. चा नम्र खुलासा.

'पकडा त्यांना. डांबून टेवा.' सावंतजींनीं हुकूम दिला.

'कां ?' द्वारकानाथानं उद्धटपणं विचारलं. या सावंताला तो ओळखत होता. दाजी नाबराकडे हा पडलेला असे तेव्हांपासून.

'सार्वजनिक जागेत दंगा करणं गुन्हा आहे, कुळकर्णी.' डेप्युटी मिनिस्टर बोलले. द्वारकानाथाचं नांव त्यांना ठाऊक होतं. पण घेणं कमीपणाचं वाटलं.

'सार्वजनिक ? अहो, ही जागा खाजगी आहे. आमच्या मालकीची.'

'ती मालकी विसरा आतां. आणि मला कायदे शिकवूं नका.'

तसा जवळच वर डोंगरावरून दाजी नाबर ओरडला, 'भांचोद ! तुझ्या सरकारांत कायदे आहेत काय रे सावंता !' केव्हाधर तो तिकडे डोंगराआड उभा होता.

'हाच तो म्हातारा !' राजाभाऊ गोळेनें वार भरला, 'हें सगळं कारस्थान ह्याचं.'

'कोणतरी साला बंदुक दे रे ! शूट करतों साल्याला.' कंपनीचा एक मालक पुरुषोत्तम मेहता ओरडला. 'सावंतजींना शिव्या करतो ब्रूट !'

'गप्प बसा !' वसंतराव सावंत त्याच्यावर उखडला. तो अडखळला होता, जरूर अडखळला होता. जड आवाजांत त्यानं विचारलं, 'दाजी तुम्हीं ? तुमची तक्रार असली तर—'

पण दाजी नाबरानं त्याला बोलूंच दिलं नाहीं. दोन्ही हात उडवून म्हातारा एकदम उसळला. ताळ सोडून वैतागानं बडबडूं लागला, 'तक्रार ? नाहीं, बिलकुल नाहीं. मी कोण तक्रार करणार ? भांचोद, ऐकून तरी घेणार कोण ? मला, माझ्या शब्दाला किंमत आहेच कुठं ? पोटच्या पोरासारखा मानला तुला. तर सावंत तूं सुद्धां फिरलास, परतलास. करा, काय वाटेल तें करा ! अरे, इंग्रज बरा ! काय ? त्यानं कंपनी सरकार खलास केलं होतं. आम्ही स्वराज्य मिळवलं. केलं काय ? राज्य दिलं ह्या–ह्या कंपन्यांकडे...'

दाजी पिसाळला होता. डेप्युटी मिनिस्टर निमूट ऐकून घेत होता.

आणि कोणाला तरी तिकडें घाई झाली. समोर मावळतीला कड्यावर एकाएकीं धडाधड स्फोट सुरू झाले. सुरुंग उडूं लागले. डोंगराला भगदाडं पडूं लागलीं. माती, ढेकळं, दगडं, धोंडे उंच आकाशांत उसळूं लागले. सडसडत इतक्या दूर, खालीं लोकांच्या अंगावर पडूं लागले. बरं झालं ! लोकं पळत सुटलीं, गर्दी पांगली. रस्ता मोकळा झाला. वाजतगाजत, नाचत मिरवीत मिरवणूक पुढं निघाली.

मंडपांत बाजूला उभी राहून वासंती उडणाऱ्या सुरुंगांची मजा बघत होती. आणि विजयश्री गप्पा करीत होती. तिला कशाचा पत्ताच नव्हता. आणि पर्वासुद्धां !









# पुन्हां एकदां पुणेरी ‘परिसंवाद’ —सारस्वत

पुण्यांत गेल्या मे महिन्यांत नियोजिलेल्या लेखक–प्रकाशक परिसंवादानें मराठी साहित्याच्या इतिहासांत एक नवीन पायंडा पडणार होता. पण कुठें खुट्ट झालें आणि परिसंवादाचा विसंवाद होऊन त्याचे सूर गेले दोन महिने सर्व मराठी नियतकालिकांत आपापल्या मताभिन्नतेसह उमटले. अजूनही कुठें कुठें असंतोषाची ठिणगी धुमसत आहे. आम्हीं ह्याबाबत एकदां लिहूनही पुन्हां संथपणें ह्या प्रकरणाचं सिंहावलोकन करावें असें वाटलें म्हणून पुन्हां ह्या विवाद्य प्रकरणाला स्पर्श करीत आहों.

प्रस्तुत परिसंवादाचें निमंत्रणपत्र ज्या सहा साहित्यिकांना पाठविण्यांत आलें ते म्हणजे चोरघडे, गोखले, पाटील, माडखोलकर, खांडेकर व श्रीपाद जोशी. ह्यापैकीं फक्त गोखले, पाटील व श्रीपाद जोशी उपस्थित राहिले. परिसंवाद जास्त ठसठशीत व्हावा म्हणून नंतर गंगाधर गाडगीळ, मिरासदार ह्यांना पाचारण केलें व तरीहि उणीव वाटली म्हणून मा. का. देशपांडे, जादुगार रघुवीर, श्री. घोरपडे ह्यांची वर्णी लावण्यांत आली. ही झाली लेखकांची ‘टीम.’ प्रकाशकांच्या संघातर्फे श्री. वि. पु. भागवत आणि रा. ज. देशमुख हे दोघेच बोलले. परिसंवाद फार लांबल्यामुळें म्हणा किंवा देशमुखांच्या हिरीरीच्या बोलण्याच्या सुरामुळें. म्हणा तदनंतर परिसंवाद आटोक्याबाहेर गेल्यामुळें इतर उपस्थित प्रकाशकांना संधि मिळाली नाहीं. ह्या परिसंवादाची योजना निमंत्रणपत्रावरून आणि अध्यक्षांच्या प्रास्ताविकावरून प्रामाणिक व कळकळीची होती हें उघड आहे. ह्या परिसंवादाची परिणति मात्र अनपेक्षित आणि विपरीत झाली ह्याचें दुःख सर्वांनाच होणें साहजिक आहे, पण ह्याचें खापर निव्वळ लेखकांच्या किंवा निव्वळ प्रकाशकांच्या माथ्यावर फोडण्याचे जे प्रयत्न तदनंतर सुरू झाले, त्यामुळें मात्र ह्या सर्व उपयुक्त उपक्रमाला वाईट वळण लागून परस्पर हितसंबंध सुधारण्याऐवजीं फाटे भलतीकडे फुटून अधिक विसंवाद निर्माण झाला आहे. वास्तविक ज्या ज्या आमंत्रितांनीं ह्या परिसंवादांत भाग घेतला त्यांनीं ह्या गर्ह्य घटनेचा स्वतंत्रपणें उहापोह करून वाग्युद्धाचा अवलंब न करतां पुन्हां एकदां एकत्र जमून खेळीमेळीनें समझोता केला असतां तर कान फुंकणाऱ्या संधिसाधू उपऱ्यांचा कार्यभाग आज जो ह्या धूळफेकींत साधला जात आहे तो साधला गेला नसता व आज दोघांचेंही जें हंसे होत आहे तें झालें नसतें.

ह्या परिसंवादाबाबत लेखकवर्गाची पक्षपाती जी बाजू आहे तिचें म्हणणें असें कीं प्रकाशकांनीं प्रस्तुत परिसंवादांत भाग घेणें इष्ट नव्हतें. प्रस्तुत परिसंवादाचें निमंत्रणपत्र पाहातां प्रकाशक त्यांत भाग घेतील ही सूचना त्यांत होती, हें स्पष्ट असतांना लेखकांनीं आतां निष्कारण हा गदारोळ उठवणें अप्रस्तुत ठरतें. हा परिसंवाद गुंफण्यांत मात्र सभासंचालकांची एकच चूक झाली कीं लेखक व प्रकाशक ह्यांच्या दोन बाजू निरनिराळ्या न करतां निवडक लेखक व प्रातिनिधिक प्रकाशक ह्यांची चर्चासत्रांत जशी सरमिसळ करतात तशी केली असती तर ही चर्चा जास्त उपकारक व समतोल झाली असती. आठ लेखकांच्या एकसूरी वक्तव्याला तोंड देणारे दोनच प्रकाशक उभे केले. त्यामुळें कुठेंतरीं घसरलेला तोल सावरता आला नाहीं आणि परिसंवाद कोलमडला हे मान्य केलें पाहिजे.

ह्या परिसंवादांत भाग घेणाऱ्या वक्त्यांनीं चर्चिल्या जाणाऱ्या विषयांचा पूर्वाभ्यास केला नव्हता व त्यामुळें (फर्स्ट क्लासचा येताजाता खर्च मिळाल्यामुळें कांहीं तरी प्रासंगिक बोलावें लागल्यामुळें कीं काय) एकदोन उभयपक्षीं अपवाद सोडून इतर वक्तव्यें अगदींच सामान्य पातळीची व खासगी कुरबुरीची म्हणून कंटाळवाणी झालीं. खुद्द अध्यक्षांनीं पार्श्वभूमि सांगतांना जी गंभीर सुरवात केली, तिला लालित्यपूर्ण ‘नवराबायकोच्या नात्याचें’ ब्रिरूद वापरून आणि ‘लेखकाच्या मनांतल्या मळमळीचा’ उल्लेख करून जें गालबोट लावलें त्यामुळेंच ह्या चर्चेला सूर कसा लागणार हें अपेक्षितच होतें आणि तें तसें झालेंही.

गाडगिळांच्या वक्तव्यांत प्रकाशनधंद्याबद्दल व्यवहार्य सूचना होत्या आणि उभयपक्षीं हितकारक ठरेल असें त्यांचें एकूण वक्तव्य समतोल, मुद्देसूद व उच्च पातळीचें होतें. त्यांच्या भाषणांत फक्त एकच सूचना खटकली; ती म्हणजे पुस्तकें जास्त खपावींत म्हणून हलक्या प्रतीची–लवकर फाटतील अशीं छापावी ही. गाडगिळांसारख्या सौन्दर्यवादी साहित्यिकाच्या मुखांतून अर्थशास्त्रज्ञ गाडगीळ जे बोलले तें आर्थिक व्यवहारांत कदाचित सुसंगत ठरेल. मागणी पुरवठ्याशी संबंधित अशा बाजारी वृत्तीशीं तें कदाचित् सुसंबद्धही ठरेल. पण पदरमोड करून हौसेनें ग्रंथसंग्रह करणाऱ्या रसिक वाचकांवर आणि आजच्या आर्थिक ओढघस्तीमुळें कसाबसा संसार करणाऱ्या ग्रंथलयावर किती आणि कसा अन्याय होईल ह्याचा विचार त्यांना सुचला नाहीं का ? कीं विनोद म्हणून त्यांनीं हें विधान केलें हें कळत नाहीं.

शंकर पाटलांनीं चर्चेस अप्रस्तुत व विषयाशीं असंबद्ध अशीं विधानें करून चर्चेला विपरीत वळण लावलें. त्यांत प्रकाशकांना डिवचण्याचा त्यांचा हेतु होता आणि तोही अशिष्ट भाषेत. ह्या भाषणानें उडालेल्या ठिणगीनें अखेरीस वणवा भडकला हे स्वाभाविकच होतें.

मा. का. देशपांडे ह्यांच्या वक्तव्यांत लेखकांना दिलेला घरचा अहेर प्रस्तुत होता. मिरासदारांनीही पाटलांच्या विधानाला प्रगट विरोध दर्शवून आपली समतोल वृत्ति स्पष्ट केली. प्रकाशकांबद्दल भले उद्गार काढून त्यांनीं तापलेलीं डोकीं थोडी शांत केलीं. ललितप्रकाशन हें फायद्याचें नाहीं हा प्रका-

शकांचा दावा विचाराई आहे असें ' त्यांनीं आवर्जून सांगितलें. श्रीपाद जोशींनी आपल्या वक्तव्यांत प्रकाशकांच्या व्यवहारी वृत्तीवर आरोप केले. त्यांनीं केरळच्या सहकारी प्रकाशन संस्थेची माहिती सांगतांना इकडच्या प्रकाशकांच्या बेमुर्वतखोरीचा व असंस्कृतपणाचा केलेला उल्लेख अगदीं अस्थानीं व अप्रस्तुत होता. अरविंद गोखल्यांनीही ह्याच सुरांत आपला सूर मिळवला आणि अप्रस्तुत घटनांचा उल्लेख करून कांहीं प्रकाशकांच्या खोटेपणाची उदाहरणें दिलीं. नंतरच्या घोरपड्यांचें भाषण छोटेसें पण विषयाला धरून आणि प्रकाशनाला नवी दिशा दर्शवणारें होतें. जादुगार रघुवीरांनीं उत्कृष्ट प्रकाशनाला वाचकांची मागणी कशी असते ह्याचें उदाहरण देतांना आपले ग्रंथ लोकप्रिय होण्यासाठीं केलेल्या वैयक्तिक प्रयत्नांची माहिती सांगितली. गंगाधर गाडगिळांनीं थोडक्यांत समारोप केल्यावर प्रकाशकांतर्फे श्री. वि. पु. भागवत बोलले. त्यांचें भाषण विनम्र वृत्तीचें माहितीपूर्ण आणि प्रकाशन व्यवसायांतल्या अडचणींचें सरळ निवेदन करणारें होतें.

अखेरीस रा. ज. देशमुख बोलले. ते आपल्या निर्भिड आणि रांगड्या भाषेंत. त्यांच्या भाषणांत स्पष्टवक्तेपणा होता. पण त्यांचा संतापामुळें तोल सुटला व ते शाब्दिक हमरीतुमरीवर आले. केरळच्या प्रकाशन संस्थेची त्यांनीं सांगितलेली तपशीलवार माहिती अचूक व श्रीपाद जोशींना निरुत्तर करणारी ठरली. वक्तृत्वाच्या ओघांत जोशी–पाटलांचे मुद्दे खोडण्यासाठीं देशमुखांनीं जी वाक्गंगा सुरू केली ती आवरण्यासाठीं भगीरथ अध्यक्षसुद्धां असमर्थ ठरले, आणि सभा एकदम उधळली गेली.

ह्या सभेनंतर लेखकांच्या आग्रहावरून देशमुखांनीं ३० मे रोजीं तरूण भारतांत आपल्या अशिष्ट भाषेबद्दल दिलगिरी व्यक्त केली व एवढ्यावर सर्व रामायण संपणें युक्त होतें. ह्या जाहीर दिलगिरीबद्दल गाडगिळांनीही त्यांचें अभिनंदन केलें. ह्या सर्व घटनांचा अर्थ लावतांना अनेक प्रश्न उभे राहातात. प्रथम हा परिसंवाद ठरवतांना त्याचें स्वरूप नक्की झालें असतें तर हा चौखूर वादंग माजला नसता. लेखकांनीं आपल्या भाषणांत फक्त आपल्या 'रॉयल्टी' पेक्षां एकंदरीत प्रकाशनाच्या सर्वांगीण व्यवहाराची चर्चा केली असती तर ती प्रस्तुत ठरली असती. प्रकाशकांनीं आमंत्रित लेखकांना चर्चेसाठीं आमंत्रण देतांना त्यांचें मुद्दे मागवून त्यांचे मुद्देसूद खंडण करण्याचा उपक्रम केला असता तर तें अधिक समर्थनीय ठरलें असतें. लेखकांनीं–विशेषतः शंकर पाटलांनीं व श्रीपाद जोशांनीं आपला साहित्यिक दर्जा ओळखून गैरलागू आणि भरमसाट विधानांनीं चिखलफेक केली नसती तर पुढच्या देशमुखांच्या वक्तव्याची हवाच गेली असती. देशमुखांनीहि सत्यकथेंत ज्या संयमानें व मुद्देसूद शैलीनें प्रकाशन व्यवहारावर प्रकाशझोत टाकला त्याच संथ चित्तानें लेखकांच्या आरोपांना उत्तरें दिलीं असतीं तर त्यांनीं फड जिंकला असता. पण त्यांचा अभिमान डिवचला गेल्यामुळें (आणि त्यांचा प्रत्यक्ष उल्लेख केला नसतांहि) असंदिग्ध संदर्भांचा समाचार घेण्यासाठीं त्यांनीं तमाम प्रकाशकांच्या प्रतिनिधित्वाचा विडा उचलून हल्ला चढविला आणि अकारण वाईटपणा मात्र मिळवला. अजूनहि वेळ गेलेली नाहीं. वाटल्यास आणखी कांहीं काळ जाऊं दे. दिवाळीनंतर लेखकही थोडेसे सुस्थितींत येतील आणि प्रकाशकही स्थिरस्थावर होतील. ह्या सर्व प्रकरणाचा तोपर्यंत नीट विचार व्हावा. लेखकांनीं आणि प्रकाशकांनीं आपापले मतभेद आणि अपप्रचार खिलाडूपणानें विसरावेत. आणि ह्या सर्व जबाबदार साहित्यिकांनीं व प्रकाशकांनीं मराठी साहित्य अधिक समृद्ध करावें हीच त्यांच्या हितैषींची सदिच्छा.

●●●










दीपावली बुद्धिबळ क्र. १



"दीपावली बुद्धिबळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचे नांव ______________________

______________________

पूर्ण पत्ता : ______________________

______________________

**दीपावली बुद्धिबळ क्र. १**

येथें कापा

### आडवे शब्द—

१ एकमेकांचें अगदीं तोंड न पहाणें.
५ गाय, म्हशी इ. पशु.
६ मनाला येणारा द्रव.
८ निर्बुद्ध मनुष्य.
९ अतिशय श्रीमंत मनुष्य.
१० पेटी.
१३ 'ययाती'चे लेखक.
१४ अंगावरचे बारीक, कोमल केस.
१५ महाराष्ट्राचे सुधारकाग्रणी !

### उभे शब्द—

१ लहान पण सुरेख, छानदार.
२ अनुकूल किंवा प्रतिकूल [ चर्चा ]
३ एक काव्य प्रकार.
४ कोंडाण्याच्या यशांतील एक वांटेकरी !
७ सर्पवैरी.
८ मोठा चोर !
१० सैनिकांचा शिस्तबद्ध संचार.
११ खंडणी.
१२ जमिनीवरील सर्वांत मोठा समजला जाणारा प्राणी !

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख**
**१० सप्टेंबर १९६३**
**अधिकृत उत्तर-पुढील अंकांत**

### स्पर्धकांकरितां नियम व अटी—

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.
२. ह्या स्पर्धेंत कोणालाहि भाग घेता येईल.
३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
४. उत्तरें 'दीपावली बुद्धिबळ,' संपादक, 'दीपावली', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावींत.
५. ह्या स्पर्धेकरितां **दहा रुपयांचीं पांच रोख बक्षिसें** ठेवलेलीं असून, तीं आलेल्या उत्तरांतून **'लॉट' पद्धतीनें काढून,** ज्यांचें उत्तर आमच्यां उत्तराशीं जुळतें असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** देण्यांत येतील.
६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.
७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**
८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १० सप्टेंबर १९६३ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

**श्रमांशिवाय जास्तीत जास्त ओझें वाहाण्यासाठीं अतिरिक्त शक्ति**



**टीएम्-बीच्या ११० हा. पा.** डिझेल इंजिनामुळें श्रमांशिवाय उभ्या चढणीवरहि जास्तीत जास्त ओझें वाहाण्यास पुरेशी शक्ती उपलब्ध होते. मजवूत टिकावू व जोरदार उत्कृष्ट उपयोगासाठीं बनविण्यांत आला आहे. फाजिल डेडवेटचें दूरीकरण, मजबूत परंतु लवचीक चौफेर, योग्य तपमानासाठीं अधिक तपमानापासून इंजिनाचा नेहमीं बचाव करणारा हीट एक्सचेंजर, प्रत्येक भागाचा दर्जा व रचना यांमुळें **टीएम्-बी** सर्व प्रकारच्या हवामानांत खडकाळ जागेवरूनहि जड माल वाहून नेऊं शकतो. मजवूत परंतु अल्प मोली **टीएम्-बीच्या** निर्दोष रचनेमुळें जळणांत जास्तीत जास्त बचत होऊन फायदेशीरपणें वाहतूक करतां येते. इतकेंच नव्हे तर सर्व भारतांतील १३२ **टी एम्-बी** सर्व्हीस सेंटर गुंतविलेलें भांडवल सुरक्षित राखतात.

टाटा इंजिनिअरींग अँण्ड लोकोमोटीव कं. लिमिटेड
सेल्स ऑफीस : १४८ महात्मा गांधी रोड मुंबई १.

**टाटा**
**मर्सिडीज - बेन्झ**



T. 3105 MAR.

